

(विकास मुद्रण, उमरखेड)

किंमत २-०० रुपये

पत्र व्यवहाराचा पत्ता— फोन

ब. ना. एकबोटे

गांधीनगर यवतमाळ

दे. भ. शंकररावजी सरनाईक-



# स्मृति-सौरभ



३० ऑगष्ट १९७५

अं त रं ग—





कै. शंकररावजी सरनाईक

# स्मृति-सौरभ



— संपादक मंडळ —


प्रा. बा. दा. जोशी. उमरखेड

प्रा. ह. अं. जोशी. उमरखेड

श्री. ल. वा. गांधे. उमरखेड



प्रकाशक
ब. ना. एकबोटे

मुद्रक व मुखपृष्ठ छपाई



उमरखेड

# - ऋणनिर्देश -



स्व. शंकररावजी सरनाईक यांच्या स्मृती एकत्र करून त्यांचे कालसुसंगत असे चरित्र प्रसिद्ध करावे अशी इच्छा होती. परंतु त्यांच्या आठवणी परिसरात मिळविण्याचा प्रयत्न करूनही शंकररावांच्या प्रसिद्धीपराड.मुखतेमुळे मिळविणे अवघड झाले. अशाही परिस्थितीत ही स्मृति चित्रे प्रसिद्ध करण्याचा संकल्प सिद्धीस जात आहे. यामुळे आम्हांस आनंद वाटतो या स्मृति–चित्राचें खरे आरेखक श्री बळीरामपंत एकबोटे त्यांनी वाशीम, पुसद, यवतमाळ, उमरखेड इत्यादी ठिकाणाहून वेगवेगळया व्यक्तींना भेटून आठवणी मिळविल्या त्या सुरक्षित ठेवल्या. त्यामुळे या चित्रांना आकार आला आहे. त्यासाठी श्री भाऊ दातार, श्री डवीर, अण्णासाहेब पांडे यांचे सहाय्य अत्यंत मोलाचे आहे.

अल्पावधीत मुद्रण करावयाचे काम अवघड असूनही ते विकास मुद्रणालयानें पत्करले यावद्दल त्यांचा ऋणनिर्देश करणे आवश्यक वाटते. मुद्रणाच्या घाईमुळे मुद्रणदोष आहेत. त्यावद्दल क्षमा याचना करून 'न्यून ते पुरते' करावे अशी विनंती करीत आहोत.









आज

तारखे प्रमाणे शनिवार दि. ३० ऑगस्टला हा स्व. दे. भ. शंकररावजी सरनाईक यांचा पुण्य स्मृति दिन या दिवशी स्मृति–सौरभ ही पुस्तिका प्रसिद्ध होत आहे.

उद्या

तिथी प्रमाणे श्रावण वद्य नवमी हा दिवस लो. ना. बापूजी अणे यांचा जन्मदिन

त्यांच्या जन्मदिना निमित्त हा स्मृति-सौरभ बापूजींच्या चरणी सादर समर्पण.

पुसद दि. ३०-८-७५



स्व. भाऊसाहेब कोषटवार



'दानेन पाणिः' असे आजीव आचरण करणारे, सर्वस्वाचे दान सतत करीत राहणारे, शंकररावांचे आमरण सहकार्य करणारे एक मुग्ध व्यक्तिमत्त्व.







जसे समर्थांचे कल्याण तसे नानांचे हे

दे. भ. अण्णासाहेब पांडे, हिवरा



# इति स्मृत्वा–

श्रद्धेय दे. भ. स्व. श्री. शंकररावजी सरनाईक यांच्या, आजच्या म्हणजे दि. ३० ऑगस्टच्या स्मृतिदिनानिमित्त त्यांच्या जीवनातील काही स्मृती चित्रांकित करण्याचा म्हणा वा रेखांकित करण्याचा म्हणा हा नम्र प्रयत्न आहे. याला छोटेसे चरित्र म्हणताच येत नाही कारण यात काल संगती नाही. इतस्ततः विखुरलेल्या आणि आठवलेल्या स्मृतीच चिन्हांकित केलेंल्या आहेत.

कारण असे की, शंकररावानी आपल्या विषयी कोठेही लेखन केले नाही, कोणास करू दिले नाही आणि कालवशात् जे प्रसिद्ध झाले ते, जेवढे त्यांच्या जवळ गेले ते त्यांनी नष्ट प्राय करुन टाकले. आमच्या सारख्या दुसऱ्या कोणी ते साक्षेपानें सांभाळावे म्हटले तर असचा साक्षेपी स्वभाव फारसा नाही. आमच्याप्रमाणेच आमचे अनेक स्नेही असल्यामुळे तसा शब्दांकित पुरावा आज मिळविता आला नाही. उद्या कोणी आणि कोठे मिळवीतील तर ते भविष्य आज वर्तविता येत नाही.

नम्र प्रयत्न असे आम्ही म्हटले तेवढे बरीक सत्य आहे तो प्रयत्न यथासांग सिद्धीस जाईल असा आमचा दावा नाही गणपती करता येत नाही त्याला शंकराची मूर्ती कशी घडविता येणार ? मात्र गणपती वा शंकर होवो, कसाही होवो पण ते वानर होणार नाही, असा आम्हास आत्मविश्वास आहे. तो श्रद्धेच्या पोटी मनात बळावला आहे. आणि तसा तो होवो अशी शंकराचे चरणी प्रार्थना करुनच या उपक्रमाचा श्रीगणेशा केला जात आहे गणपतीचा वशीला शंकराच्या भावपूजनासाठी खचितच उपकारक ठरेल असे वरचेवर वाटत असल्यानेंच हे धाडस केलें जात आहे म्हणूनच म्हणावयाचे की इति स्मृत्वा–

# - समर्थांचा उत्तमपुरुष -



नाना उत्तम गुण सत्पात्र । तेचि मनुष्य जगमित्र ।
प्रगट कीर्ती स्वतंत्र । पराधेन नाही ।।
उत्कट भव्य तेंचि घ्यावें । मळमळीत अवघेंचि टाळावे ।
निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळी ।।
नम्रपणें पुसो जाणें । नेमस्त अर्थ सांगों जाणे ।
बोला ऐसें वर्तो जाणें । उत्तमक्रिया ।।
प्रपंची जाणे राजकारण । परमार्थी साकल्य विवरण ।
सर्वांमध्ये उत्तम गुण । त्याचा भोक्ता ।।
दुसऱ्याच्या दुःखे दुखवे । दुसऱ्याच्या सुखे सुखावे ।
आवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ।।
कोणी एक काम करितां होते । न करितां ते मागे पडते ।
याकारणे ढिलेपण ते । असोंचि नये ।।
जितुके कांही आपणासी ठावे । तितुके हळुहळु सिकवावे ।
शाहाणे करुनि सोडावे । बहुत जन ।।
कोठेंच पडेना दृष्टी । ठाई ठाई त्याच्या गोष्टी ।
वाग्विळासें सकळ सृष्टी । वेधिली तेणे ।।
सकळ अवगुणामध्ये अवगुण । आपले अवगुण वाटती गुण ।
मोठे पाप करंटपण । चुकेना की ।।
अंतरासी लागेल ढका । ऐसी वर्तणूक करू नका ।
जेथें तेथे विवेका । प्रकट करी ।।

** -



## स्व. शंकररावजी सरनाईक



# पितृतुल्य नाना

(रा. म. उपाख्य भाऊराव दातार, वाशीम)

वत्सगुल्म (वाशीम) हे पौराणिक आणि ऐतिहासिक दृष्टया अतिशय महत्त्वाचें स्थान आहे. अनेक तीर्थस्थाने असल्यामुळे तितकेच ते पवित्रही आहे. त्याचे प्राचीन माहात्म्य टिकविणारे व वाढविणारे काही महापुरुष अलीकडल्या काळात होऊन गेले. कै. नारायणराव भट, कै. केशवराव हवालदार, इत्यादी थोर राष्ट्रभक्त या भूमीत होऊन गेले. महर्षी भाऊसाहेब साने, आग्रही व निग्रही मधुराव हवालदार, कर्मवीर अण्णासाहेब डवीर, श्रमजीवी तात्या साहेब दातार, क्रांतिकारक त्र्यंबकराव मार्कंडे आदी महान राष्ट्रभक्तांच्या कर्तृत्वाचे शिलालेख येथे कोरल्या गेले आहेत. वत्सगुल्माची शान वाढविणाऱ्या या परंपरेत कै. शंकर सखाराम सरनाईक यांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. या सर्व महापुरुषांच्या कर्तृत्वाचा सुगंध आजही या भूमीत दरवळत आहे.

## उत्कृष्ट शिक्षक म्हणून लौकिक–

शंकरराव सरनाईक हे आम्हाला पितृतुल्य होते. त्यांना आम्ही आपुलकीने नाना असे म्हणत असू. येथे त्यांचे चांगले मोठे व मजबूत असे घर होते. प्रेमळ मनमिळावू आणि उत्कृष्ट शिक्षक म्हणून त्यांनी अल्पावधीत लौकिक मिळविला होता. इंग्रजी, मराठी आणि मोडी मधील त्यांचे अक्षर मोत्याच्या दाण्याप्रमाणे होते. देशसेवा, राष्ट्रभक्ती हे नानांच्या रोमारोमात भिनले होते.

१९१४-१९१५ च्या सुमारास ते पुसदला गेले. पुढे पुसद हीच त्यांची कर्मभूमी बनली. तेथे त्यांच्यातील सर्व गुणांचा कलेकलेने विकास झाला. १९१४ च्या सुमारास श्री, निळकंठराव भट यांना भागीदारीत घेऊन त्यांनी श्री हटकेश्वर कापड दुकान सुरु केले. ते आजही अटी व नियम न मोडता सुस्थितीत चालताना दिसते.

*नऊ महिन्यांचा कारावास--*

नाना राष्ट्रीय कार्याचे धडे गिरवू लागले त्या काळात १९०४ साली बंगभंगाची चळवळ सुरु झाली. कॉंग्रेसचे प्रमुख अंग असणाऱ्या राष्ट्रीय पक्षाच्या अनेक ठिकाणी शाखा-उपशाखा स्थापन होऊ लागल्या १९०९ साली ह्या पक्षाची शाखा स्थापन करण्याचा प्रयत्न झाला पण तो अयशस्वी ठरला. १९१४ ला महायुद्ध पेटले आणि सर्वांनाच परोक्ष-अपरोक्ष त्याच्या झळा लागल्या. परिणामतः सर्व पक्ष थंडावले. १९१५ ला मुंबई व १९१६ ला लखनौ येथे कॉंग्रेस अधिवेशने भरली पण हवा तसा समझोता झालाच नाही. गुंता वाढू लागला व तेवढ्यातच १९१६ ला होमरुलची स्थापना झाली. १९२० ला लोकमान्य टिळक दिवंगत झाले आणि या पक्षाची अपरिमित हानी झाली. नक्की ह्याच वेळेवर महाराष्ट्र राष्ट्रीय पक्षाच्या डोळ्यासमोर कौन्सिल प्रवेशाचा प्रश्न उभा ठाकला. पण तिकडे महात्मा गांधींनी असहकारितेचा नारा लावला. टिळक पक्षियांना अर्थातच हीं गोष्ट आवडली नाही, राजकारणात गांधीजींचा पक्ष जोर धरु लागला आणि १९२६ साली कौन्सिल निवडणुकी उभ्या राहिल्या. तिचे नेतृत्व गांधीजींकडे आले. कौन्सिल प्रवेशाबद्दल अर्थातच राष्ट्रीय स्वराज्य पक्षाचा विरोध नव्हता आणि अशाच वेळी कायदेभंगाची चळवळ जन्माला आली. एवढे पुराण सांगण्याचे कारण असे की जसजशा घटना घडत गेल्या तसतशी त्याची वाच्यता खल-चर्चा आणि निर्णय नानांच्या बैठकीत होऊ लागला. त्या निर्णयांची अंमलबजावणी करण्याचे निश्चयही होऊ लागले. ह्या प्रसंगी लोकनायक बापूजी अणे व तपस्वी बाबासाहेब परांजपे यांच्या देखरेखीखाली वैदर्भीय पुढारी ( त्यातही विशेषतः यवतमाळ जिल्ह्यातील पुढारी ) एकत्र जमू लागले व एकमताने निर्णय घेऊ लागले. त्यांच्या मार्गदर्शनाखाली काम करणारे सर्व देशभक्त परिस्थितीचा अभ्यास करीत. स्वतःचा वाटा उचलीत आणि इच्छित कार्यक्रमात सहभागी होत. नानाही याला कधीच अपवाद राहिले नाहीत. लोकनायकांचे वादातीत नेतृत्व मान्य करुन ते सक्रीय पाठिंबा देऊ लागले त्यांचा आदेश मानून नानांनी पुसद शहरात पहिला जंगलचा सत्याग्रह केला. त्यात नऊ महिन्यांची शिक्षाही भोगली 'स्वराज्याची पंढरी' या सार्थ नामाभिधानाला पात्र होण्याचे भाग्य पुष्पावती नगरीस (पुसद शहरास) लाभले त्यात नानांचा सिंहाचा वाटा आहे.

*स्वदेशाचा पुरस्कार--*

नानांनी सार्वजनिक जीवनाचे पावित्र्य वैयक्तिक जीवनातही टिकविले त्यांनी स्वदेशीचे व्रत स्वीकारले पण प्रसंगी तडजोड पत्करली नानांना ही तड जोड मान्य नव्हती. उभ्या आयुष्यात त्यांनी साखरेला स्पर्श केला नाही, स्वदेशाच्या व्रताचे पालन करणारे नाना सामान्यात राहून असामान्य झाले.

*आतिथ्यशील घराणे--*

जे खाण्याच्या बाबतीत, तेच वस्त्राच्या बाबतीतही त्यांनी काटेकोरपणाने पाळले, स्नानादी कर्म आटोपताच ते खादीचे जाड-

भरडे पण स्वच्छ धुतवस्त्र वापरीत. खादी शिवाय अन्य कपडे त्यांच्या अंगावर कधीच दिसले नाहीत. ते नास्तिक मुळीच नव्हते पण कर्मठमाणसाप्रमाणे अवडंबर अथवा भपका त्यांच्या आन्हिकात दिसला नाही. श्राद्ध पक्षादी आवश्यक धार्मिक कार्यक्रम ते उरकीत. अशा कार्यक्रमांशिवाय सामान्य माणसे ब्राम्हण भोजन घालीत नाहीत पण न सांगताही त्यांच्या पंक्तिला ब्राम्हण जेवला नाही, असे कधीच घडले नाही. त्यांचे घराणेच मूलत: आतिथ्यशील ! पण त्यातही त्यांच्या संसारात ही बाजू आमच्या काकू सत्याकाकू ह्याच संभाळीत. नानांच्या सांसारिक यशात काकूंचा फार मोठा वाटा होता, काकूंचे साहय नसते तर नानांच्या कीर्तीचा ध्वज इतका उंच गेलाच नसता. सत्प्रवृत्त, सदाचारी अशी ही नानांची सहधर्मचारिणी ! वेगळे काय वर्णन करावे ! नानांनी अनेक संकल्प सोडले असतील पण सहस्त्रभोजन घातल्याचें पुण्य काकूंना जोडता आले, त्यामुळें त्या समाधानी होत्या, दोघेही आपापल्या जागी तृप्त होते.

## नेतेपद कां ?

नाना कोणत्याही पक्षाचे पुढारी नव्हते ते स्वत:ला तसे मानीत नसत अथवा कोणी तसे म्हटलेलेही त्यांना आवडत नसे. पण जनता मात्र त्यांना पुढारीच समजे. ज्यांना जनसंमर्द हेलावता येत नाही त्यांनी नेतेपद का मिरवावे, असाच जणू त्यांच्या म्हणण्याचा आशय असावा. त्यांच्याजवळ प्रभावी वक्तृत्व नव्हते. पण एखाद्या प्रवचनकाराप्रमाणें मृदू भाषेत, गोड गळयाने आणि भक्तिभावाने ओथंबलेले प्रसंग ते सांगत तेव्हा श्रोत्यांना 'ब्रम्हानंदी लागली टाळी' या अवस्थेत आणून सोडीत आपल्या व्याख्यानात ते पौराणिक दाखल्यांचा अनेकदा वापर करीत.



## पुराणग्रंथांचा आदर–

'महाभारता' सारखा ग्रंथ सामान्य जनांना हाताळता यावा म्हणून नानांनीं बरीच वर्षे खर्ची घालून आणि मूळ आशयाला शक्यतो धक्का लागू न देता 'महाभारत–सार' हा ग्रंथ उपलब्ध करुन दिला. या कामी त्यांना वे. शा. सं. वासुदेवशास्त्री खरे यांची मोलाची मदत झाली. त्यांच्या मदतीशिवाय नानांना हे काम करता आलें नसते. आपले पुराण ग्रंथ राष्ट्राचे भविष्य घडविण्यास साहय करतात, या गोष्टीवर त्यांचा विश्वास असल्या-मुळे त्यांनी पुराणग्रंथांचा आदर केला. देशाची विघडलेली घडी जकद बसावी असे वाटत असेल तर पोथ्यापुराणांच्या आधारे जनतेची मने जिंकून ती बसविता येईल, असे त्यांना वाटत होते.

## स्वप्न साकारले !

१९३४–३५ मध्ये नानांनी कोषटवार मुद्रणालय वाशीम करांच्या हाती सोपविले. त्यांनी वाशीम सोडले पण वाशीमकरां-विषयीचे अपरंपार प्रेमाचे नातें यत्किंचितही कमी होऊ दिलें नाही, याचे प्रतीक म्हणून या गोष्टीचा उल्लेख करता येईल. या मुद्रणालयाचा भरपूर फायदा उचलून कर्मवीर अण्णासाहेब डबीर यांनी 'वत्सगुल्म–पुराण' प्रसिद्ध केलें. ते प्रसिद्ध मुद्रणालय यवतमाळ येथे श्री बळीरापंत एकबोटे यांच्या स्वाधीन केले. त्यावेळपासून 'स्वदेश' च्या माध्यमातून जनजागरणाचें कार्य ते करीत आहेत. या दोन्ही प्रयत्नांनी नानांचे स्वप्न साकार झाले, या मुद्रणालयाने यशाचे भरपूर माप नानांच्या पदरी टाकले, असे म्हणायला हरकत नाही.

## शिक्षण आणि लोकशिक्षण—

पुसदला जुन्या काळापासून (१९१४ पासून) दौलतखान एडेड स्कूल ही शैक्षणिक संस्था चालत होती. हे कार्य नेटाने आणि उच्चस्तरावरुन चालावे म्हणून श्री कोंडुआप्पा कोषटवार यांच्या सारख्या धनिकांनी हाताशी धरले. १९४४ साली कोषटवार हायस्कूल नावारुपाला आणलें. विद्यार्थ्यांच्या शिक्षणाबरोबरच जन जागृती आणि लोकशिक्षण यासाठी त्यांनी टिळकांच्या गणेशोत्स-वाची कास धरली. पुसद वाशीम येथे साधारणतः एकाच वेळी म्हणजे १९२०–२१ च्या सुमारास गणेशोत्सव सुरु झाले. वाशीम पुसद येथील मंडळाचें कार्य एकदिलानें चालत होतें: याला कारणहीं नानाच होते, हे सांगण्याचीं गरज नाही.

## सौजन्याचे प्रतीक—

नाना हे सौजन्याचे प्रतीक होते. त्यांना कोणीच विरोधक वाटत नसत विरुध्द पक्षाबद्दल व परपक्षाबद्दल नितांत आदराची भावना त्यांच्याजवळ होती. त्यांच्या कर्तबगारीची कीर्ती परिसरात सर्वत्र पसरली होती. त्यांनी विधिमंडळात जावें. म्हणून अनेकांनी त्यांना गळ घातली. १९३७ मध्ये लौकिक यशापयशाचा विचार न करता लोकहट्ट पुरविण्यासाठी ते निवडणूकीस उभे राहिले. नानांनी तिथें जाऊ नये अशी नियतीची इच्छा होती की काय कोण जाणे? नानांना मात्र निवडणुकीत विजयश्रीने माळ घातली नाही.

## प्रसिद्धीपराङ्मुखता—

व्यासपीठ गाजविणे हे त्यांच्या प्रकृतीत नव्हते. पण व्यास-पीठावर बसण्याचाहीं नानांना मोह नव्हता, व्यासतुल्य विद्वानांच्या व्यासंगाचा पुसदकरांना फायदा व्हावा या भावनेनें त्यांनी १९४६ ला विदर्भ साहित्य संमेलन भरविले, या निमित्ताने जमलेल्या व्यासांसाठी अक्षरशः पीठावर बसण्याचे काम त्यांनी संभाळले. पीठ मिळून अतिथी म्हणून आलेल्या व्यासांना सुग्रास व यथेच्छा जेवू घालण्याची व्यवस्था त्यांनी केली. नानांचे हात नसते तर हे संमेलन तरी होऊ शकलें असते की नाही कुणास ठाऊक? एवढ्या संमेलनात ते कुठेच दिसले नाहीत. हा त्यांच्या प्रसिद्धीपराङ्मुख-तेचा पुरावा नव्हे काय?

## देश उभा राहावा—

नाना आणि भाऊ कोषटवार तासनतास बोलत बसत. काय बोलत ते कळत नसे. पण सामान्यतः भाऊ वक्त्याची आणि नाना श्रोत्याची भूमिका स्वीकारीत. ऐकणाराला उत्सुकता असायची. कितीतरी वेळानंतर नानांचा आवाज येई. कधी ते म्हणत, "भाऊ, प्रत्येकाचं कर्तृत्व वादातीत असावं लागतं. सामुदायिक अत्याचाराचा उगम जसा उपाशी पोटातून होतो तसा वर्गकलहातून होतो ते प्रत्येकानं लक्षात ठेवलं पाहिजे. अराजकता माजू लागली तर तिचं खतपाणी तावडतोब बंद करायला हवं. त्यात पाप नाही." आपला देश खऱ्या अर्थानें देश म्हणून उभा राहिला पाहिजे, ही तळमळ त्यांच्या बोलण्यातून व्यक्त होत असे. नेहमी श्रोत्याची भूमिका बजावणारे नाना देशभक्तीची गोष्ट निघताच आग्रही वक्त्याची भूमिका स्विकारीत.

## जनतेवर निर्व्याज प्रेम—

नानांच्या देवघरात अनेक देव होते त्यांची पूजा करण्याचे भाग्य मला अनेकदा लाभले. देवघरात अनेक देव असले तरी मनात मात्र लोकमान्य टिळक, लोकनायक अणे आणि तपस्वी परांजपे हीच त्रिमूर्ती होती. या राष्ट्रीय देवतांचें संस्मरण त्यांना

स्फूर्तिप्रद वाटे. राजकारणी डोके आणि देशभक्तिचे हृदय यांचे अन्योन्य नाते असू शकते की नाही ? अशा प्रश्नांचे उत्तर लोकमान्य, लोकनायक यांच्या मूल्यांमधून हा लोकसेवक शोधत असे. आपले वृध्दत्व, जबाबदारीचे नेतृत्व व सोबत सामाजिक, धार्मिक आणि राजकिय कर्तृत्व यांचा आगळा आविष्कार त्यांना घडविला होता. To make room for better young generation हे तत्व उराशी बाळगून तरुण रक्ताला वाव देण्याचा पुढाकार घेणारांमध्ये ते प्रमुख होते. मनात यत्किंचितही चल–बिचल नाही. जे करावयाचे ते नियोजन पुर्वक व जाहीरातबाजी शिवाय अशी त्यांची वृत्ती होती. त्यांची प्रत्येक कृती स्वाभिमान जागृत करणारी होती. सदैव राष्ट्रभक्तिची ज्योत उरात तेवत ठेवणारे नाना जनतेवर निर्व्याज प्रेम करीत असत. याच त्यांच्या गुणांमुळे त्यांना राजकीय अस्तित्व प्राप्त झाले असावे असे मला वाटते.

श्रद्धांजली--

नाना दिवंगत झाल्यापासून प्रतिवर्षी सातत्याने कोपरगाव विद्यालयात नानांचे पुण्यस्मरण होते. या निमित्ताने तिथे जाऊन त्यांच्या पावनस्मृतीला श्रद्धांजली वाहण्याचे भाग्य मला अनेकदा मिळाले. आज या चरित्र प्रकाशनामुळे ते मिळत आहे याचे समाधान मला वाटते.








शंकररावांना एकूण तीन मुले. देवाघरुनच नियोजनबद्ध होऊन आलेल्या या दांपत्याला कालाची बंधने आणि निर्बंध यांची कांही आवश्यकताच जणू नव्हती. काकूंनी तीनच मुलांना जन्म दिला होता हे खरं. पण काकूंना मुलं किती हे सांगणं कठीणच. मी म्हणेन आणखी एक मानलेला पुत्र मी ! पण असा गर्व मी वाहू शकत नाही. कारण काकूंची मायापाखर अनेकांवर होती हे मी पाहिलेलं आहे. आपली मुलं तेवढीच आपली असा संकुचित भाव त्यांचे मनी कधी नव्हताच मुळी. घरांतील सर्व कामे यथासांग, वेळची वेळी उरकून आजती भोवती, नात्यागोत्याच्या, शेजार धर्माच्या अशा घरी जाऊन काकू त्यांची वास्तपुस्त करीत. अडी अडचणी विचारुन आपल्या मायेच्या पंखांनी त्यांना वारा घालून येत. महाभारतात द्रौपदीच्या स्त्री जीवनाचे वर्णन केलं आहे, त्यात म्हटले आहे की ती केव्हा झोपत असे हे कुणाला कळावयाचे नाही, केव्हा उठत असे हे पण माहीत व्हायचे नाही. सर्वांच्या नंतर झोपावे आणि सर्वांच्या आधी उठावे. काकू या अनेक बाबतीत भारतीय परंपरेतील आदर्श गृहिणी वत्सल माता होत्या.

पाहुण्यांची वर्दळ सतत असावयाची. कधी कधी भरपूर अंथरुणें, पांघरुणें असूनही कधी कधी काकूंच्या वाट्याला कांहीही शिल्लक रहावयाचे नाही. एखाद वेळी देवघरात पाटाला पाट जोडूनच रात्र काढावी लागत असे. पण काकू एखाद्या शांत आणि शांत ! ऋषि पत्नीप्रमाणें तात्त्विक जीवन आनंदाने कंठीत होत्या.

काकूंचा जीवन पट त्यांच्या मुलांपैकी कोणीतरी लिहावयास पाहिजे होता कारण जी मुलं लहानपणापासून मातेच्या अंगावर खेळली

आणि मोठी झाली तेच त्या मातुश्रीचे यथार्थ चित्रण करु शकतात. मी काकूंना पाहिले म्हणजे बोलतांना पाहिले नाही, हासतांना पाहिले नाही. त्या कधी अशा खेळा मेळात गेलेल्या मी पाहिले नाही. त्या जशा उदासीन नव्हत्या तशा त्या हासून खेळून जीव रमविणाऱ्या नव्हत्या. एक निर्विकार मूर्ती, सदा सेवारत. स्वकर्माचे अनुष्ठान एखाद्या योग्याप्रमाणें निरंतर चालू. शंकररावांना मुलगी नव्हती. सुना बऱ्याच उशीरा आल्या पण काकूंच्या घरात बाळंतपणं झालेली मी पाहिली आहेत. नात्यातील संसारी मुलाची पत्नी स्वतःचे माहेर समजूनच काकूंच्याकडे बाळंतपणाला येत असत. खरोखरीचे माहेर असेच त्यांना वाटत असे. उधार उसनवारीचे हे नाते नव्हे याची खात्री हरघडीच्या काकूंच्या वागण्याने होत असे.

काकू बोलत नव्हत्या अबोल म्हटलं तरी चालेल एखाद्या यंत्राप्रमाणें त्यांचे हात पाय सतत कार्यरत असत. काम-काम-काम. यजमानाचे मुलांचे, पाहुण्यांचे, सर्वांचे सर्व प्रकारे आतिथ्य. घरात जेवणी चालत असतांनाच नानाजवळ बसलेल्या बळिरामाला सुंठ आणि साखर आणून देतील. त्याला कांही तरी झालय असे कानावर गेल्याचा परिणाम ! अनेक अवधान सांभाळण्यात काकूंचा हातखंडा असे.

तुझ मूल उठले आणि रडेल, सुनेला झोपवून स्वतः मध्यरात्री स्वयंपाक करुन, नको नको म्हणत असतांना, आलेल्या अपरिचीत पाहुण्यांना जेवू घालणाऱ्या काकू म्हणजे आम्ही आमच्या माता म्हणून समजू नये तर दुसरे काय ? असाच एक प्रसंग आठवतो. उमरावतीहून उमरखेडला जाण्याकरिता मी स्टँडवर आलो. शंकररावांना कळविले होते ' मी आज उमरखेडला जाईन.' सकाळी निघालो आहे. पोहचायला सायंकाळ होणार आहे' नाना स्टँडवर भेटायला आले. एकटे आले नाहींत सोबत काकू एक डबा घेऊन आल्या. असे लाड पुरविण्याला मी पात्र नाही हे दुःख, कोणीहीं असे अगत्य दाखविले नाही हे दुःख; बापू विठ्ठल, माता रखुमाई राऊळातून आल्या, देवळातून आल्या पण ज्याचे करता आलो तो पुंडलिक नव्हे याचे परम दुःख ! तू कसा हा विचार सोड असे माझे मन मला सांगते आणि हे दैवी संपत्तीने समृद्ध असे मातापिता यांचे दर्शन कसे तेवढेच बघ असे मन



पुनःपुन्हा बजावते. डोळ्यातून अश्रू ओघळतात. साक्षात पांडुरंग तुझ्या समोर उभा ठाकला आणि करंट्या तुला ओळखता आला नाही केवढे दुर्भाग्य ! असो.

नाना शरीराने क्षीण झाले. चिरंजीव स्वतः डॉक्टर, नाना मित आहारी. क्षीण शरीर असूनही जे जीवन जगले ते असह्य यातनाचे नव्हते. काकू अखेरपर्यंत धर्मपरायण पत्नी म्हणून सेवा करीत होत्या. एक दिवस नाना गेले आणि अल्प काळातच शंकररावांचा संसार म्हणजे संत एकनाथाचा संसार होता. किती लोक येतील, कोणत्या श्रेणीचे येतील आणि कितीक राहून जातील, जेवून जातील याची गणती करताच यावयाची नाही. बापूजी अणे, बाबासाहेब परांजपे, वाशीमकर मंडळी, यवतमाळकर मंडळी, पु. भा. भावे, मा. सी. फडके आणि कोण कोण म्हणून सांग ? सर्वांचे सर्व प्रकारचे आतिथ्य होत असे ते कोण करीत होते ! आमच्या आदरणीय काकू. अशी धर्मपत्नी, अशी वत्सल माता मिळावयास पूर्व पुण्याई लागते. तिचा भव्य साक्षात्कार शंकररावांच्या कुटुंबात मीच नव्हे अनेकांनी पाहिला. महाभारतसाराच्या निमित्ताने कै. वासुदेव शास्त्री महिनोनगणती तळ देऊन बसलेले असत. त्यांचे त्यांच्या परीनें यथासांग स्वागत होत असे.

स्नुषा आल्या. एक दुर्दैवीने गेली, एक मृत्युशय्येवरुन उठली आणि एकच मोठी सून घरसंसार सांभाळण्यास सिद्ध अशी मिळाली. शंकरराव म्हणत 'माझी सून मोठी ध्वांक्ष आहे बरं' म्हणजे कितीही श्रम पडले तरी कामाचा रगाडा कष्टाने पण आनंदाने पार पाडते. त्यांना सूनेंच्या कार्यतत्परतेचा सानंद अभिमान वाटत होता. पण मला एक वेगळा अनुभव सांगावयाचा आहे. एका बाळंत मुलीला तिच्या लहान अर्भकासह आणि मला मातृवत् असलेल्या तिच्या आईसह एके रात्री बारा वाजता मी शंकररावांचे घरी पोहचलों वेळ म्हणून माझ्या बरोबरच्या बाया ओशाळून म्हणाल्या आतां आम्हाला जेवायला नको. काकू उठल्या, सूनबाईही उठू लागल्या. काकूंचे शब्द मी एकले सूनबाई, तू उठू नको.

काकू एकाएकी गेल्या. जणु सुवासिनी जाण्याचा मोह त्यांना आवराया लागला. मी गेले तर यांची या जराजर्जर अवस्थेत सेवा कोण करणार ! म्हणून नाना गेले आणि मग काकु एकदमच इहलोक सोडून गेल्या. सरनाईक बन्धूची पितृछाया आणि मातृछाया एकाच वर्षात नाहीशी झाली पण हे दोघेही असे गेले की, जेष्ठ पुत्र दिगंबर अत्यंत विचारी, सुशील आणि सर्व कुटुंबाचा खरा त्राता हे शंकररावांनी पाहिले. मोठ्या सूनबाईने घर चालविण्याची काकुंची परंपरा तंतोतंत चालविली आहे हे त्या दोघांनी समाधानाने पाहिले आणि एकामागून एक दोघांनीही डोळे मिटले. या माता पित्याला प्रणाम, विनम्र प्रणाम, शत शत प्रणाम.!





## पुसद शहरातील सभा संमेलने

शंकररावजींच्या संयोजन कौशल्याने पुसदमध्ये आणि तालुक्यात अनेक सभा संमेलने झाली. त्यांच्या ओझरत्या आठवणी तरळत्या दृष्टीला ज्या आजही दिसत आहेत. त्यांचा नुसता उल्लेख करण्याचा मानस आहे. श्री हटकेश्वर मंदिर हें त्या काळातील सभास्थान. श्री निळकंठराव भट त्या संस्थानचें व्यवस्थापक. नेमानें झाडलोट आणि दिवाबत्ती करण्याचे काम ते करीत. त्यांच्यानंतर त्यांचे चिरंजीव चिंतोपंत यांनी ते काम केले. प्रतिवर्षीचा राष्ट्रीय गणेशोत्सव, टिळक जयंती, टिळक पुण्यतिथी आदि कार्यक्रम वर्षा-नुवर्षे तेथेच व्हावयाचे. गीतावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे यांची प्रवचने तेथेच होत. पुण्याचा पुसदशी इतका दृढ ऋणानुबंध बाबासाहेब परांजपे आणि शंकरराव यांच्या मुळे प्रस्थापित झाला की, लोकमान्यानंतर न. चिं. केळकर एकदा पुसदला आले, तात्यासाहेब करंदीकर तर दोन वेळा आले. याच हटकेश्वराजवळ १९३० सालच्या जंगल सत्याग्रहाचें शिबीर होते. मला वाटते भागानगर सत्याग्रहाचें शिबीरही त्याच परिसरात असावे.

शंकररावजींच्या प्रयत्नाने नोआखलीतून परिस्थिती पाहून आल्यानंतर श्री पु. भा. भावे यांची भाषणे येथेच झाली. श्री बाबासाहेब खापर्डे यांची व्याख्यानमालाही येथेच झाली. बाबासाहेबांचे वास्तव्य मात्र बाबासाहेब कुटुंबे यांचे कडे होते. १९१८ साली लो. मा. टिळक आले त्याच दिवशी जिल्हा परिषदेचें अधिवेशन बापूसाहेब तांबे यांचें अध्यक्षते खाली झाले त्यानंतर १९२४ साली बहुधा बालाजी मंदिरात श्रीमान दादासाहेब खापर्डे यांचें अध्यक्षतेखाली जि. सभेच्या विद्यमाने परिषदेचें अधिवेशन भरले. दादासाहेबांचा मुक्काम नृसिंह मंदिरात होता. मध्यंतरीचें एक अधिवेशन आठवत नाही. पण १९३४ साली दादासाहेब सोमण यांचे अध्यक्षतेखाली श्री शंकरलालजींच्या चित्रपट गृहांत भरले. त्यावेळी लो. ना. अणे नुकतेच लोकसभेत निवडून आलें होते: त्यांच्या अभिनंदनाचा पहिला ठराव आला आणि तो प्रस्तुत करण्याचे भाग्य मलाच लाभले.

हिंदुसभेच्या विद्यमाने याच नाटयगृहात भरलेल्या एका प्रचंड सभेचा वृत्तान्त मोठा मनोरंजक आहे. स्वातंत्र्य वीरांनी एका नामवंत आर्यसमाजी नेत्याला मुंबईहून अध्यक्ष म्हणून पाठविले होते. श्री रामभाऊ मंडलीक, संत पाचलेंगावकर महाराज, बाबासाहेब खापर्डे, बाळशास्त्री हरदास आणि अतिरथी महारथी उपस्थित होते. सभेच्या कार्यासही निधी हवा म्हणून तशी मागणी करणारा एक ठराव शंकररावजींनी मांडला. आणखी कांही वक्त्यांची भाषणे झाली. श्रोत्यांमधून देणग्यांचा वर्षाव सुरु झाला. शेवटी, बाबासाहेबांना घोषणा करावी लागली की आता हा देणग्यांचा कार्यक्रम थांबवू, या सभेचे पुष्कळ काम काज अजून व्हावयाचे आहे.



## शंकररावांची वाणी

शंकरराव बोलत होते की गात होते की रडत होते हे वर्णन करुन सांगता येत नाही. त्यांचें भाषण मधु मधुर असे होत असे. त्यात संगीताचा गोडवा असे. कारुण्याने ओथंबलेले भाषण करीत असताना, त्यांचेंच डोळे डबडबून येत आणि अश्रु ओघळत असत. याचे कारण असे की त्यांचें हृदय त्यांच्या वाणीतून पाझरत असे आणि त्यामुळे श्रोत्यांची मनेही विरघळून जात असत. हिंदु-सभेच्या भव्य अधिवेशनांतील अनुभव जसा वर वर्णन केला तसाच एक अनुभव आणखी सांगतो. स्व. दिनकर शास्त्री कानडे आले होते त्यांचे हे येणे पहिले नव्हते. याच नाटयगृहांत त्यांची भाषणें यापूर्वी, शंकररावांनी तिकीट लावून आयोजित केली होती. शास्त्रीबुवांच्या या सभेत शंकरराव बोलले. स्वातंत्र्योत्तर काळातील या सभेत एकूण राजकीय परिस्थितीने त्यांचे मन विव्हळत होते. राजकारणात चाललेला मतामतांचा गदारोळ त्यांच्या मनाला सहन होत नव्हता. ओल्या नेत्रांनी त्यांनी ती व्यथा आपल्या वाणीतून व्यक्त केली. कानडे शास्त्रीना या कळवळलेल्या मनांच्या शांतीसाठीच आपले भाषण करावे लागले. अपरिपक्व परिस्थितीत मिळालेले आपले स्वराज्य आहे युद्ध परिस्थितीमुळें ते आपल्यावर येऊन कोसळल्यासारखें दिसत आहे. त्याचा हा परिणाम आहे. त्याबद्दल दुःखी होणे न लगे.

अशीच एक सभा याच नाटयगृहात बापूजी अणे यांच्या सन्मानार्थ झाली. ते दिल्ली सरकारच्या कॅबिनेटचे मेंबर झाल्यानंतर प्रथमच आणि एकदांच पुसदला आले होते बापूजी सरकारी

गोटात पगारासाठी गेले असा प्रचार चालू होता. शंकररावांचे मन या प्रचाराने हळहळत होते. या सभेत शंकरराव या संदर्भात तळमळून म्हणाले. अर्थात् मन तळमळले की अश्रु ओघळलेच हे आता वेगळे सांगावयास नको. ते म्हणाले 'आमचें राजकारणात चुकत असले तर आम्हाला मूर्ख म्हणा पण बदमाष नका हो म्हणू !

बापूजी सभेत याबद्दल काहीही बोलले नाही. पण घरी आल्यानंतर म्हणाले "शंकरराव लोकांनी काय म्हणावे हा त्यांचा प्रश्न आहे. मूर्ख म्हणा बदमाश म्हणू नका हा तुमचा आग्रह कां ? त्याना ते स्वातंत्र्य आहें. ते त्यांना उपभोगू द्या" आपण दुःखी होण्याचे काहीच कारण नाही. १९४६ साली विदर्भ साहित्य संमेलन याच नाटचगृहात झाले त्यात शंकरराव कोठेही मिरवताना दिसले नाही. पण सूत्रधार तेच होते. ना. सी. फडक्यांचा मुक्काम त्यांच्याकडे होता. असे किती म्हणून प्रसंग आठवावे आणि सांगावेत ! अनेकांना पाचारण केले अनेकांचे सत्कार केलें. प्रथितयश पुरुषांचे तर केलेच पण स्थानिक मंडळीचाही त्यांना तसाच परामर्श घेतला.

कै. डॉ. बल्लाळांची मुलगी सुमती आणि माझी मुलगी सरोजिनी बी. ए. झाल्यात. त्यांचेही कोषटवार विद्यालयांत नानांनी कौतुक केले. आणि त्यात भाऊ कोषटवार सामील झाल्याशिवाय कसे राहतील. सौ. द्रवीड सोडून या मुली तालुक्यातील पहिल्यांदा बी. ए झाल्या याचा आनंद शंकररावांना वर्षानुवर्षे गीताफेरी प्रभात काळी नेमाने काढणाऱ्या उद्धवरावांचा जाहीर सत्कार त्यांनी केला. सर्वश्री नाथ बाबा, निळकंठराव भट आणि भाऊ कोषटवार हे तीन आदर्श म्हणून एक पुस्तिका तयार करुन तिचे प्रकाशन जाहीर सभेतून केलें. अकोल्याचे सुप्रसिद्ध सर्जन डॉ. नानासाहेब चौधरी सर्जन होऊन आले तेव्हा पुसदला पाचारण करुन नानांनी कोषटवार विद्यालयांत त्यांचा सत्कार केला. सर्वांचे स्वागत आणि कोड कौतुक करणे हाच नानांच्या संत हृदयाचा भव्य आणि दिव्य आविष्कार.



# समकालिनांच्या सुखद सहवासात–

## : श्री शंकरराव सरनाईक :

शंकररावांच्या भोवती कोण हे सांगण्यापूर्वी शंकरराव कोणाभोवती हे सांगणेच अधिक उचित ठरेल नाही कां ? १९१८ साली लो. मा. टिळक पुसदला आले. त्यांचा तो विदर्भातील दौरा ऐतिहासिक स्वरुपाचा संस्मरणीय झाला. लोकमान्यांचे वास्तव्य किंचितकाळपर्यंत भोपी यांच्या नृसिह मंदिरात होते. हजारोनीं लोक टिळकांच्या दर्शनाला जमले. लोकमान्यांच्या समवेत असलेले कृष्णाजीपंत खाडिलकर, बाबासाहेब खापर्डे आदी देशभक्त सर्वांना दिसले. टिळकांच्या मिरवणुकीत सर्वांच्या पुढे घोडेस्वार सेनापती कै. गोविंदशास्त्री पाठक, कै. नानाभाऊ येरावार हे होते. गळयात मखमलीचे पट्टे, हातात उंच भाला, एक टोक पायावर टेकलेले आणि वर उंच फडकणारा ध्वज दुसऱ्या टोकाला, हे दृश्य सर्वांनी पाहिले सूर्य डोक्यावर तळपत असताना पुष्पेच्या वाळवंटांत हजारो श्रोत्यांसमोर टिळकांचे भाषण झाले. या वाळवंटात भाषण करताना "मला भागीरथीच्या वाळवंटात पंढरपुरला झालेल्या व्याख्यानाची आठवण येते' असे लोकमान्य म्हणाले आणि म्हणूनच पुसद शहराला 'स्वराज्याची पंढरी' हे नामाभिधान मिळाले.

कांही तासाचाच हा भव्य चित्रपट. पण या चित्रपटात शंकरराव कुणाला दिसले का? व्यासपीठावर बसलेले हार घालताना वगैरे? तपस्वी बाबासाहेब होते. पण शंकरराव कोठेच दिसले नाहीत. 'दास डोंगरी राहतो, यात्रा देवाची पाहतो' हा समर्थांप्रमाणे शंकररावांचा स्वभाव खरोखरी शंकरराव म्हणजे एक महामानव. पण स्वभाव हा असा, कोठेही न दिसण्याचा. ओघाने आठवले म्हणून सांगतो. लो. ना. बापूजी अणे आले, बैठकीत बसले. त्यांच्या भेटीला आलेले कित्येक मंडळी लोड-तक्याशी टेकून ऐसपैस बसले. पण त्यात शंकरराव मात्र नाहीत. अगदी न कळत आले नि तक्या नसलेल्या एका कोपऱ्यात बसले. अहो शंकरराव ! या की !! छे: छे: !! पण कोपऱ्यातील जागा सोडली नाही. की पुढे सरकले नाहीत. कुठेतरी अधेमधे बसून हळूहळू लोडापर्यंत सरकत जाणारी माणसे आम्ही अनेक पहात आलो पण टेकण्यापासून दूर राहणारे शंकरराव म्हणजे शालिनतेचा मूर्तिमंत अवतारच.!

***

## लो. ना. अणे व तपस्वी बाबासाहेब परांजपे

लोकनायक बापूजी अणे आणि तपस्वी बाबासाहेब परांजपे ही शंकररावांची दोन आराध्य दैवतेच. दोघेही कांही काळपर्यंत कांग्रेसचेच सेवक होते. कांग्रेसशी दोघांचेही मतभेद झाले पण बाबासाहेब कांग्रेसपासून दूर गेले. बापूजी पण कांग्रेस जवळून कधीच दूर गेले नाहीत. तीव्र मतभेद तात्त्विक स्वरुपाचे झाले म्हणजे स्पष्ट बोलावयाचे. कार्यकारिणीत राहणें उचित वाटले नाही तर तेवढा राजीनामा द्यावयाचा पण कांग्रेस सोडावयाची नाही असा बापूजींचा बाणा होता. हे दोन्ही महाभाग वेगवेगळया मतात वावरत होते



तरी एकजीव होते ही, गोष्ट बापूजी राज्यपाल असताना. बाबासाहेब त्यांचे जवळ राहिले आणि तेथेच त्यांचा देहान्त झाला हे. सर्वश्रुतच आहे. शंकरराव मात्र या दोघांचेही सारखेच उपासक शंकररावांनी बापूजीचे अनुयायी म्हणून पुसद तालुक्याची सर्व निष्ठा प्राणपणाने व जिद्दीने उभी केली हे जितके खरे तितकेच बाबासाहेब परांजप्यांचा एकही शब्द शंकररावांनी खाली पडू दिला नाही. हेही खरे आहे दोघांचेही पुसदचे निवासस्थान म्हणजे शंकररावांचे ते पावन मंदिरच म्हटले तर ते वावगे ठरणार नाही.

!!!

## गोविंदशास्त्री पाठक

शंकररावांच्या भोवती धनिकांचा मेळावा जसा आदरपूर्वक होता तसाच तो तत्कालीन कार्यकर्त्यांचाही होता. कै. गोविंदशास्त्री पाठक हे शंकररावांचे समकालीन सहकारी. शंकरराव पुसदला येण्याचे आधीपासून राष्ट्रीय चळवळीत ते लोक जागृतीचे कार्य करीत होते. आखाडे आणि वाचनालये स्थापन करणे हे तेंव्हाचे राष्ट्रकार्य होते. त्यावर सरकारचा डोळा होता. गोविंदराव बाबा महाभारत रामायणाचे व्यासंगी अभ्यासक होते. शरीराने मल्ल होते. फर्डे वक्ते असून दोन दोन तासपर्यंत अस्खलीत बोलत आणि विनोदात श्रोत्यांना गुंग करुन सोडीत. केवळ भाषणेच करुन थांबत नव्हते तर चळवळीतील कोणतेही काम अंगावर घेऊन करण्यास ते मागेपुढे पाहत नसत. सरकारने मोगाला सभेची दवंडी देण्यास मनाई केली तर बाबा स्वत: गळयात ताशा अडकवून सभेची दवंडी देत. बलुत्याच्या चळवळीत महारानी मेलेली गुरे ओढीत नाही म्हटले की बाबा तेही करावयाचे. बाबांचा पिंड समाज सुधारकांचा, त्यामुळे

त्यांनी वेगवेगळी मंडळी साथीला घेतली, मूळच्या राष्ट्रीय वृत्तीच्या मंडळींची जी संघटना तयार झाली होती तिच्यापासून ते दूर गेले. त्यांनीही कायदेभंगात तुरुंगवास भोगला होता, पण मतभेदाचे पोटी ते थोडासा उपहास वगैरे करुन शंकररावांची टर उडवीत असत. शंकरराव मात्र शांत, स्तब्ध कोणी निंदा अथवा वंदा त्यांचा सोशिकता हा धंदा. गोविंदराव बावांच्या घरी काहीही अडचण येवो तेथे पहिल्यांदा शंकरराव जायचे मातुश्रीस चिरंजिवाला भेटून ती अडचण दूर करावयाचे काय केले ते कधीच स्वमुखाने उच्चारावयाचे नाही हे व्रत. !

***

## राजाभाऊ पाठक

गोविंदराव बावांनी कीर्तनाची आख्याने तयार केली, निरुपणे. बसविली. राजाभाऊंची उंच, धिप्पाड, गौरकाय मूर्ती. त्यांच्याकडे पाहताच प्रसन्न वाटावयाचे. आवाज गोड आणि पहाडी त्यांनी कीर्तन करुन लोक जागृती करावयाची. त्यांच्या कीर्तन रंगांत दंग होणारा मीही एक श्रोता होतो. पुढे बावांचे आणि त्यांचे ऋणानुबंध अत्यंत दुरावले पण शंकररावांची जवळिक कधीच अणुमात्र कमी झाली नाही. गोविंदराव बावांच्या संदर्भात मी राजाभाऊंची आठवण आधी नमूद केली.

***

## भाऊ कोषटवार

शंकरराव हे नाना आणि कोषटवार हे दोघे खऱ्या अर्थाने एकमेकांचे भाऊ, शंकरराव सतत कार्यरत विविध सार्वजनिक कामात दंग. भाऊ मात्र एकच काम करीत. तें म्हणजे सतत दान करण्याचे. श्रद्धयादेयम् असे त्यांचे व्रत आंधळेपणाने चोराला मसाई धार्जिण



म्हणतात तसे मात्र नाही हो; नानांच्या आणि भाऊंच्या आवडी सारख्याच. पुण्याचे अनाथ विद्यार्थी गृह, गीता धर्म मंडळ, याला भाऊ देणग्या द्यावयाचे. नानांचे संकल्प भाऊंच्या सहविचारानेच सुटावयाचे आणि भाऊचे दान हेच सर्वांचे आधी आणि सर्वापेक्षा अधिक असावयाचे, गरीब बाई दाराशी मोळी विकावयास आली, तिचे वस्त्र फाटलेले दिसले, भाऊनी घरात जाऊन नगरी लुगड्याची नवी घडी आणली, तिला दिली. "बाई जा लवकर" म्हणून तिला विनविले. दानाची जाहिरात नको म्हणणाऱ्या या दात्याची दानत कोणत्या शब्दात वर्णन करावी ? भाऊ हे नानांचे जन्म भराचे जीवा भावाचे सहकारी होते.



" देशाचा संसार । आहे अंगावरी ।
ऐसे थोडे तरी । वाटू द्या हो ॥"

"देशाच्या संसाराची अहोरात्र चिंता करणाऱ्या देशभक्तांना या उक्तीतून उपदेश करावयाचा नसून देशसेवेच्या गप्पा मारणाऱ्या लोकांना काही सांगावयाचे आहे. आपले घर-दार, कांता-पुत्र, चित्त-वित्त किंबहुंना सर्वस्याचे समर्पण करणाऱ्या देशभक्तांबद्दल आपण किती कृतज्ञ असतो ? जे लोक देशसंसाराची चिंता वाहतात, त्यांच्या संसाराची चिंता समाजाने वाहणे अत्यावश्यक असते. ज्या देशात असे चित्र दिसेल तो देश पुढारलेला असे मी म्हणेन." एकदा व्याख्यानाच्या ओघात वरील विचारधन श्री. शंकररावजींनी पुसद वासियांना दिले होते.





## नीळकंठराव भट

श्री. नीळकंठरावजींचा काटेकोरपणा आदर्शवत् होता. नीटनेटकेपणा, टापटीप, संसारिक जीवनातील हिशेबीपणा, साधेपणा वाखाणण्यासारखा होता. व्यवसाय शिक्षकांचा, सेवा हाटकेश्वराची आणि जीवन सौम्य, संथ आणि शांत. शंकररावजींचा आणि त्यांचा भ्रातृभाव सांगतांना एकच खंत वाटते की गानोंचा बंधुभाव नव्हता कोणाशी ? कोण त्यांना आपल्याहून वेगळा मानीत होते ? इतके असूनही ही मंडळी कोणीही कधी एका बैठकीत चकाट्या मारतांना दिसले नाहीत. स्वे स्वे कर्मण्येभिरता: अशावृत्तीत सारे असत.

## असेच ते रामचंद्र मास्तर!

शंकररावांच्या चर्येवर सहजासहजी न दिसणारे स्मित मास्तरांच्या चेहऱ्यावर सदैव खिलसत असे. कोईमतुरी विनजरीचा चौकोनी फेटा, अर्ध्या किंवा पूर्ण बाहयांचा सदरा, पायघोळ नसलेले धोतर, आणि कोकणी जोडा हा रामचंद्र मास्तरांचा नित्याचा वेष. बोलणे प्रांजळ, हासणे निर्मळ आणि वागणेही तसेच लोज्वळ. मर्यादित उत्पन्न आणि त्यात समाधान मानणारे व्यक्तिमत्व.



## शंकररावांचा संपन्न स्नेही

स्नेही म्हणू की सहकारी, सहाय्यक म्हणू की अनुयायी हे मला ठरविता येत नाही. इंग्रजाच्या परकीय अंमलाखाली असतांना आणि केव्हाही, धार्मिक वर्ग सत्तेपासून किंचितच दूर जात नव्हता. तो तसाच नेहमी असतो हा त्रिकालाचा अनुभव आहे. पण पुसद शहर मात्र याला अपवाद होते. भगवान शंकराच्या जटेंत गंगा होती असे म्हणतात, पण पुसदची पुष्पानदी मात्र आमच्या शंकराचे चरणी वाहत होती. पुसद शहरातील लहान मोठ्यांना ते गंगाजळ पावन करीत होते. परिणाम असा कीं, शंकररावांना सर्व सार्वजनिक कामात, द्रव्याची मदत सढळ हाताने होत असे. भाऊ कोपटवार यांनी तर सर्वस्वाचेच दान केले होते म्हणा पण सर्वश्री पापीनवार, चिद्दरवार आदी सर्व आर्य वैश्य घराणी राष्ट्रीय कर्तव्यांचें पालन धैर्यानें आणि निष्ठेनें करीत होते.

## हेच पहाना, राजाराम पुंडलिक

तोच कोकणी जोडा, फेटा कोईम्तुरी मात्र जरीचा शेमला मुळीच नाही कळीचा असे हे आपल्या धनिक मित्रांसह राजरोस घराबाहेर पडून पैसाफंडासाठी झोळी घेऊन दारोदार फिरले. ही सरकारला न मानवणारी कृती एकेपरी देशद्रोहात्मक होती. राजारामपंतांना राजभय नव्हते तशीच देशाकरता हातात झोळी घेण्याची जनलज्जाही नव्हती. मी मोठी माणसे पाहिली, त्यांनी गरिबांना मदत पुष्कळच केली पण श्रीमंत माणसे हातात झोळी घेऊन भिक्षा मागतात अशी देशभक्ती फक्त पुसद शहरातील धनिकांच्या वृत्तीतून पहावयास मिळाली पैसा कितीही मागा, पण सरकारला



कळेल असा बभ्रा नको आणि हातीं भिक्षा पात्र नको, असे म्हणणारे लोक सर्वत्रच असतात. पण पुसद शहर त्याला अपवाद होते. याचा एक भव्य आविष्कार सांगावयाचा झाला तर श्री. पुंजाप्पा चिद्दरवारांनी कोषटवार विद्यालयास एक सभागृह बांधण्याकरिता देणगी तर दिलीच पण विरक्त होऊन ते पुसद शहर सोडून हरिद्वार येथे संन्यासी जीवन कंठीत पुष्कळ दिवस तेथे राहिले. धनिकांच्या त्यागाचे हे प्रातिनिधिक स्वरूप वर्णन करीत असलो तरी अशी कितीतरी माणसे पुसद येथे होती मानवतेच्या सुवर्णाचा हा साठाच जणू शंकररावांच्या स्वाधीन या महाभागाच्या रुपाने देवाने केला होता असाच याचा अर्थ मी तरी करतो.

## अन् ते बिटुसावकार

पापिनवार घराणे धनाढ्य: निवृत्ती आप्पा म्हणजेच बिटु सावकार आजही बाबासाहेब व पापीनवार आणि त्यांचे विस्तारलेले कुटुंब आहेच. पण आधी एक विस्मयकारक गंमत सांगतो. यवतमाळ जिल्हा परिषदेचे अधिवेशन पुसदला भरले होते. १९१८ साली लो. आ. टिळक त्यादिवशी स्व. बापूसाहेब सांबे यांचे अध्यक्षतेखाली अधिवेशन होतेच. त्यानंतर पांच सहा वर्षांनी बालाजी मंदिरात हे अधिवेशन होते. मला वाटते त्या अधिवेशनाचे अध्यक्ष कै. दादासाहेब खापर्डे असावेत. बालाजी मंदिरातील भोजन मंडपात सुग्रास भोजन करुन मी दाराशी आलो तों 'घ्या पानविडा' असे म्हणत हातात पानविड्याची परडी घेऊन उभे होते कोण ? अहो, हेच ते बिटु सावकार ! शहरातील पहिल्या पाचांत ज्यांना धनिक म्हणून क्रमांक. कदाचित पहिला दुसराच. त्यामाणसाने हाक मारली असती तर माझ्यासारखी कितीतरी पोरं पुढे आली असती, ती परडी घेऊन उभी राहिली असती. लोकांना देता, लोकांची दृष्टी चुकवून एखाद् दुसरे आपल्या तोंडातही टाकले असते पण त्या धनिकाची ती सेवा देशसेवा होती. त्यांचा हातचा विडा म्हणजे परमेश्वराने त्यांच्या रुपाने माझ्या हातात दिलेला तांबूलाचा प्रसादच वाटला. असे होते ते बिटू सावकार. धन्य ते आणि त्यांचे याच वृत्तीचे अन्य धनिक स्नेही

शंकररावांच्या भोवती शिकलेली पदवीधर मंडळी हाताच्या बोटावर मोजण्याइतकीच होती. आता जसा विद्वत मयूर पिसारा सर्वदूर पसरलेला दिसतो. डॉक्टर आणि वकील स्थानिक क्षेत्रापासून उदयाला आलेले आहेत. तसा तो काळ नव्हता. विदर्भातील सर्वच तालुक्याचे ठिकाणी वकील आणि डॉक्टर बाहेरुन आलेले कै. डॉ. वल्लाळ आणि डॉ. केळकर डॉ. भगवानसिंह काकण मात्र सार्वजनिक जीवन जगलेले आणि साक्षीभूत असलेले सुदैवाने आजही हयात आहेत. वकिलात कै. कुटुंबे, द्रवीड; सप्रे आणि नातू. आज सारेच्च अंतर्धान पावलेले ! कुटुंबे हे शंकररावांच्या अनेक कार्याचे अध्वर्यु आणि सल्लागार. नानासाहेब द्रवीडांनी नानांचा शब्द कधी अपमानीत केला नाही. अण्णासाहेब सप्रे तर अत्यंत सात्विक. कांहीकाळ नगरपालिकेचे उपाध्यक्षही होते. भाऊसाहेब नातू तसेच सात्विक आणि अध्यात्मप्रेमी. शंकररावांनी भाऊ कोपटकारांच्या प्राथमिक आणि भरीव देणगीने जो ट्रस्ट निर्माण केला त्याचे अध्यक्ष होते. बाबासाहेब कुटुंबे. निवृत्तीनाथांना गुरु मानून आणि साक्षी ठेऊन जशी ज्ञानेश्वरी सांगीतली तशीच वेगवेगळया कार्यात वेगवेगळी प्रतीके समोर ठेवली व काम केले शंकररवानीं. ट्रस्टचे निर्माते ताबा आणि मुख्य दाते भाऊ. पण भाऊ कोठेच दिसावयाचे नाही. नाना दिसत ते जणू कारकून म्हणूनच. हिशेब पै पै चा चोख ठेवावा, बाबासाहे कुटुंबे यांना दाखवा आणि त्यांची सही त्यावर घ्यावी.

त्यागी तपस्वी ब्राम्हण पण पारंपरिक वणिक वृत्तीच्या माणसाप्रमाणें हिशेबात चोख आणि दक्ष. याच कारणाने नव्हे आणखी अनेक कारणांनी, हिशेबातील रतिमात्रांची चूक रात्रभर शोधीत बसलेले एकनाथच जणू नव्या जीवन वेगात अचूक हिशेब करुन स्वार्थ आणि परमार्थ साधणारे जणू एकनाथच, शंकररावांच्या रुपाने अवतीर्ण झाले होते.





# ‘कर्ते सुधारक’

## शंकररावजी सरनाईक



‘कर्मे ईशु भजावा’ या तत्वाने महाराष्ट्रात जे परिवर्तन झाले त्या परिवर्तनाच्या अध्यायनामधून व प्राचीन महाराष्ट्राच्या सार्थ स्वाभिमानातून एका वेळी ज्ञानेश्वरांच्या कथनानुसार शंकररावजीनी केलेल्या आत्मनिवेदनाची आठवण या ठिकाणी होते. उमरखेड येथे कै. कृ. रा. देशपांडे गुरुजी या निधनानंतर जी शोकसभा झाली त्या सभेत बोलतांना शंकररावजी म्हणाले होते. खरा धर्म हा ग्रंथ पठण, यज्ञयाग, व्रत वैकल्ये प्रवचने इत्यादीत नसून तो लोकसेवेतच असतो याचे मार्मिक उदाहरण आपल्या आचरणाने देशपांडे गुरुजी यांनी दाखविले आहे. शंकररावजींचे हे वक्तव्य स्मशाण वैराग्यप्रमाणें तात्कालिक नव्हते, त्यांनी आपल्या जीवनातही याच सूत्राचा अवलंब करुन, आजन्म लोकसेवेचे व्रत घेतले. यावरुन असे वाटते की, ‘कर्मयोगी दिसती वेगळाले। परी ते आत्मस्वरुपी एकवटले ॥’ असे म्हटल्यास अप्रस्तूत वाटू नये.



# एक विस्मयकारक स्मरण

श्री. विठ्ठल आप्पांच्या घरांत शंकरराव रहावयास गेले होते. स्वतःच्या मालकीच्या घरापूर्वी ते आधी श्री. भाऊसाहेस उदाराम राजे यांच्या आणि नंतर विठ्ठल आप्पांच्या घरात राहत असत. त्यांच्याकडे एक मौंजी-बंधनाचे कार्य झाल्यानंतर रात्रीच्यावेळी शहरातील कांही स्नेह्यांना त्यांनी तीर्थ प्रसादास बोलाविले. त्यात बाबासाहेब कुटुंबे हे प्रमुख होते. माझे भाग्य असे की, त्यांचेकडे कोणताही प्रसंग असो. मला सूचना यावयाचीच. मी गेलो म्हणजे माझे तिकीटाचे पैसे द्यावयाचे. एकदा द्यावयास विसरले तर ते माझ्या खात्यांत माझ्या नावाने दोन रु. जमा करुन ठेवलेले मुख्य गंमत अशी की मंडळी जमली, तीर्थप्रसाद वितरण झाले आणि हळूच शंकरराव आले नि बाबासाहेब कुटुंबे अध्यक्ष कोपटवार ट्रस्ट यांचें जवळ उभे राहून म्हणाले 'माझ्या मुलाची मौंज झाली. स्नेह्यांनी मला अहेर दिला ती रक्कम गेले कांही महिने माझे जवळ पडून आहे. त्या साडेसातशे रुपयाचे आजपर्यंचे व्याज रु अडीचशे त्यात घालून मी हे एक हजार रु. ट्रस्टच्या स्वाधीन करीत आहे असे म्हणून त्यांनी एकहजार रु. श्री. बाबासाहेब कुटुंबे यांच्या स्वाधीन केले मीच काय पण सारे स्तिमित झाले !



# कै. अप्पासाहेब राजे उदाराम

कै. भाऊसाहेब राजे उदाराम हे तर शंकररावांना वडिला-समानच होते. पण जी माणसे मला आठवतात त्यात अशी काही माणसे होती ती सरकार जमा समजली जात असत. पण शंकररावजींच्या सौजन्याने ते सरकारच्या गोटातील असूनही राष्ट्रकार्याचे सहाय्यकर्ते असत. उदा:- आप्पासाहेब राजे उदाराम हे त्या काळचे ऑनररी मॅजिस्ट्रेट. पण शंकररावजींच्या सर्व कामात साथीदार. परिणामतः अप्पासाहेबांचे सहकारी मॅजिस्ट्रेट कै. मुगाराव जी जांबकर, यशवंतराव पोशिकर हे दोघे आम्हालाच उपकारक. याचा अर्थ वाचकांच्या ध्यानात येईल की आमच्याच माणसे जातीयतेच्या नावाखाली हाताशी धरुन आमच्या राष्ट्रीय चळवळीत विस्कळीतपणा आणण्याचा जो प्रकार ब्रिटिश अमदानीत चालू होता त्याला पुसदचे बेंच कोर्ट अपवाद होते. हा देखावा या तालुक्यात असा दिसत होता की पुसदची बेंचकोर्टची माणसे राष्ट्रीय निवडणुकीत आमच्या बरोबर असावयाची आणि उमरखेडची मात्र नेमकी विरुद्ध असावयाची. पुसदच्या उपरोक्त तीन प्रमुखातच पुसदचे श्रीमंत सावकार कै. नामदेवआप्पा पापीनवार यांचाही अंतर्भाव करावयास पाहिजे. या मंडळींनी आमचा विरोध कधीही केला नाही. अप्पासाहेबांच्या ताब्यात लोकल बोर्ड म्हणजे जातीयतेवर आणि सरकारपक्षावरही अंशतः विजयच.

काही माणसांचा नामोल्लेख केला कांहीचा विस्मृतीत लुप्त झालेला असणार. त्याबद्दल त्यांची व त्यांच्या विद्यमान वंशजाची क्षमा मागणे हे मी माझे आद्य कर्तव्य समजतो. आज जी माणसे विद्यमान आहेत त्यात सर्वश्री. बापूराव झानोबा, शंकरलालजी, विठ्ठलराव भागवत यांचे सारखे कितीतरी आहेत की जे नाना म्हणजे गृहदैवत मानीत आले आहेत.

## वसंतराव नाईक आणि बाबासाहेब सुखरे

शंकररावांच्याच विद्यमान स्थितीत उदयास आलेले हे दोन तुल्यबल नेते. बरेच दिवस हे दोघेही एकजीव. नंतर या दोघात तीव्र मतभेद झाले. विदर्भ राज्याच्या चळवळीमुळे तर हे दोघे एकमेकापासून दूर गेले. तरीही नाना हे दोघांना सारखेच प्रिय आणि पूज्य वाटत. नानांचे आशीर्वाद लाभावेत, त्यांचा अपमान आपण किंवा अन्य कुणीही करु नये अशासाठी हे दोघेही नेते अतिशय जपत असत. शंकररावांचे द्वितीय चिरंजीव डॉ. भाऊसाहेब सरनाईक यांनी या दोघांचेही सहकार्य मनोभावे करुन प्रथम वसंतरावजींच्या पुसदच्या निवडणूकीचा भार यशस्वीपणे वाहिला आणि बाबासाहेब सुखरे यांच्या नेतृत्वाला जी धार चढली त्यात भाऊंचा वाटा सिंहाचा आहे.

## * जय आणि विजय *

मी म्हणणार होतो शुंभ आणि निशुंभ. पण त्यामुळे एका उच्च नैतिक पातळीवरील चारित्र्य संपन्न स्नेहावर फार मोठा अन्याय झाला असता. म्हणून म्हणतो मी फुकटचा जय आणि माझे परमादरणीय स्नेही श्री अण्णासाहेब पांडे हिवरेकर हे विजय. श्री हिवरेकर शंकररावांच्या सत्वसंपन्न नेतृत्वाची आघाडी संभाळणारे एक प्रभावी आणि यशस्वी नेते. शरीरानें झिजावे, द्रव्याने खोरी व्हावे, मन तर सदाचेच देशकार्याला वाहिलेले. त्यात एकच वेहोषी की आम्ही बापूजी अण्यांचे, तपस्वी बाबासाहेब परांजप्यांचे आणि शंकरराव सरनाईकांचे. लोक मोक्षगुरु करतात. आम्ही गुरु करण्याचे कधीच मनात आणले नाही. जे जे संत सत्पुरुष येतात त्यांचें आणि पारंपरिक जे गुरु वडिलापासून आहेत ते तर आमचें गुरु आहेतच पण आमचे आनंद. परमानंद, सुखाचे परंधाम हे की आम्ही वरील तीन सिद्ध पुरुषांचें अंतेवासी.

यात खरा विजयाचा वाटा अण्णासाहेबांचा आहे. शंकररावांचे आशीर्वाद म्हणा की प्रेरणा म्हणा; पुसद तालुक्यातील खेडे न् खेडे पायाखाली तुडवून ज्यानी जातीय चळवळीवर मात केली, ब्राम्हणेतरांतील मातब्बर माणसांचा विश्वास संपादन केला आणि निवडणुकी एका मागून एक जिंकल्या ते सारे कर्तृत्व अण्णासाहेबांचे, त्यांचा प्रामाणिकपणा, त्यांचा सेवा-भाव सर्वांचे मनांत इतका रुजला की तेथे जातीयतेला थारा मिळाला नाही. अशा किती माणसांची नामावली सांगू ? सर्वश्री आनंदराव धनसळकर, नारायणराव गावंडे, देवबा पाटील धारकर, गावजी पाटील, अवधूतराव नाईक, जांबुवंतराव खरूसकर, तेजमलजी ब्राम्हणगांवकर आदी कितीतरी माणसानी सारी खेडी प्रेम-वश केली, विश्वास संपादन केला आणि जिल्ह्यात राष्ट्रीय अधिसत्ता स्थापन केली.

या साऱ्या शतक्रतूचे श्रेय मुख्यत: शंकररावांच्या पावन प्रेरणेला आणि अण्णासाहेबांच्या अथक परिश्रमाला ! मीं कोठे होतो असे कृपया कोणी विचारू नका. कुणाच्या खाटेवर मांजर जाऊन बसतें. कुणाच्या पायाशी कुत्रे लोळण घेते आणि विश्वव्यापी मनाची माणसं हाही भगवंताचाच अंश म्हणून प्रेमाने त्यालाही कुरवाळतात तसा माझा प्रवेश शंकररावांजवळ झाला. त्यांनी मला हाडं म्हटले नाही, त्यांना स्थिरचरातील परमेश्वर पाहण्याची दिव्य दृष्टी देवानें जन्मत:च दिली होती. त्यामुळे मला समर्था घरचे श्वान बनण्याचा सुवर्ण योग आला. मी या आयत्या

संधीचा लाभ मिळाल्याने या सर्वांच्या कृपेचा लक्ष्य बनलो. अशी अनेक माणसे नानांनी जवळ केली, जवळच ठेवली. जवळ आलेला माणूस कधीही दूर गेला नाही शेवटी गेले नानाच ! आम्हास येथे एकटे टाकून ! त्यांच्या सहवासात गेलेले क्षण परम सुखाचे. त्याच सुखाच्या सौरभात उरलेले दिवस आम्ही कंठीत आहोत !





# सुगंध दरवळला !

—जयवंत देशमुख (कोल्हे) उमरखेड

स्व. शंकररावजी सरनाईक हे एक सच्चे समाजसेवक म्हणून आख्या पुसद परिसरात सर्व थरातील लोकांना सुपरिचित होते. अर्थात निरपेक्ष सेवा व त्यागी वृत्ती झाकल्या जात थोडीच ! परंतु मूळचे ते रहिवासी मात्र वाशीमचे १९१५ मध्ये ते पुसदला आले आणि तेथे श्री भाऊसाहेब राजे उदाराम यांच्या वाड्यात वास्तव्य करुन राहिले. अनेक कार्यक्रमांच्या निमित्ताने, संपर्क साधण्याच्या निमित्ताने लग्नकार्याच्या ओघात अशा अनेक कारणांनी मा. शंकररावांचे पुसद--उमरखेडच्या परिसरात जाणे येणे होत असे. उमरखेडच्या त्यांच्या मुक्कामात पू. कृष्णराव देशपांडे गुरुजी यांच्या व्यक्तिमत्वाचा प्रभाव त्यांच्यावर पडला आणि ते चमकले ! 'गुणी गुणं वेत्ती'। या न्यायाने देशपांडे गुरुजींचे सोज्वल व पावन व्यक्तिमत्व, त्यांची निरपेक्ष समाजसेवा, शाळेतील वातावरणात विद्यार्थ्यांच्या प्रती दिसून येणारी तळमळ व सहानुभूती या गोष्टी शंकररावांच्या नजरेतून सुटणे शक्य नव्हते. हळूहळू त्यांची मित्रता दृढ झाली. आणि म्हणूनच स्व. देशपांडे गुरुजींच्या शेवटच्या आजारपणाच्या काळात श्री शंकररावजी येथे आले होते. चार--दोन दिवस अखेरचा त्यांचा सहवास त्यानी अनुभवला आणि अंत्य यात्रेत सहभागी होऊन शेवटी स्मशानात आपल्या वाणीतून स्व. देशपांडे गुरुजींना आपली आदरांजली वाहिली ! एक समाजसेवक मावळला म्हणून श्री शंकररावांचे अंत:करण विदीर्ण झाले. आणि त्यानंतर स्वत: शंकरराव हेच समाजाला अखेर कार्यकर्ते म्हणून लाभले.

सहज आठवते म्हणून सागतो. १९३५ साली श्री. नानासाहेब राजे पुसद यांच्या लग्नाच्या निमित्तानें श्री. शंकरराव सरनाईक यांचे उमरखेडला येणे झाले. यादवराव देशमुख यांच्या-वडील मुलीचे ते लग्न होते. त्यांच्या सहवासानें व अस्तित्वानें सारा परिसरच भारावून जात असे. येथील मुक्कामात आपल्या सर्व सुहृदांच्या भेटी घेणे, सर्वांच्याकडे जाणे, आपला संपर्क वाढविणे हे शंकररावांचे नित्याचेंच होते. त्यांच्याशी होणाऱ्या सुखसंवादातून व मोकळ्या बोलण्यातून त्यांच्या निर्मळ वृत्तीचा सुगंध सर्वत्र दरवळत होता आणि त्यामुळेच की काय कोणतीही जाहिरात न करता आपोआपच साध्या भेटी गाठीतून शंकररावा-बद्दलचे लोकांचे आकर्षण वाढत होते. साधेपणाचें सौंदर्य ! चालते बोलते साधुत्व ! त्यांच्या सहवासाचे सुख शब्दात वर्णन करणे कठीण आहे. माझे त्याना शतशः प्रणाम.





# मोठ्यांच्या छोट्या गोष्टी

## लो. ना. अणे आणि सरनाईक यांचा अगत्यवाद

एकच गोष्ट सारस्वरूपात सांगावीशी वाटते पण एका कारणानें खंतही वाटते. मोठ्याच्या गोष्टी सांगाव्यात मोठ्यांच्याचीनें, पण आपण मात्र त्या प्रकारापासून शतयोजनें दूर रहावे याची खंत वाटते. पुन्हा असेही वाटते की आपण सांगून मोकळे व्हावे. कोणी समानधर्मी असतील वा निपजतील त्याना तयीरीत्या प्रबोदक वाट-ल्यावाचून राहणार नाहीत.

बापूजी नागपुरात असले म्हणजे त्याच शहरातील अनें-कांच्या आठवणी काढीत आणि मला तेथे भेटायला घेऊन जा असे सारखे म्हणीत असत. मोटारीतून जायचें झाले तरी त्याना त्रास हा व्हावयाचाच. श्री अगाशे तो टाळण्याचा प्रयत्न करीत. काशी-करांकडे निरोप पाठवून येथे बोलावून घेतो ना तेव्हा बापूजी गर्जून उठायचे अरे मला गेले पाहिजे. बोलवायचे कां म्हणून ?

यवतमाळास आले म्हणजे जी घरं पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण अशा भिन्न टोकाला असावयाची कोणाच्या घराची पायरी चढून जाता येत नसेल तर दारातच उभे रहावयाचे. अरे. भय्या-साहेब बोबडे यांची बहीण येथे आहे त्यांना भेटून आले पाहिजे. भय्यासाहेब विचारतील ना. माझ्या बहीणीला भेटलात का म्हणून ? असे सारखे, ज्या गावांत जातील त्या गावांतील नातवंडासारखी लहान लहान माणसं कां असेनात त्याना जाऊन भेटणे हा बापूजींचा स्वभाव. आणि तोच शंकररावांचाही !

एकदा उमरखेडला आले मला म्हणाले, चल जरा, अण्णारावांकडे जाऊन भेटून येऊ. सितारामपंताकडे जायचय बरं कां ? तात्याजी वाझेरे, गणपतराव जोशी यांचे कडे जाऊ या. आप्पाराव सोडलें तर गणपतराव, तात्याजी हे माझे सहकारी, शंकररावांना मुला सारखे. त्याना शंकरराव आलेत एवढे कळलें तरी ते येऊन नमस्कार करुन जाण्यासारखे. पण नाही, मला जायचे. सितारामपंताकडे पुरुष माणूस कोणी नाही, शंकरराव त्यांच्या बैठकीची पायरी चढून जाणे तुम्हाला जड जाईल. अरे, मैनाबाई असतील ना. दारात बोलावू. बोलू आणि पुढे जाऊ दारात उभे राहून कां होईना पण ऋणानुबंधियाकडे जाणे आणि कुशल विचारून जाणे हा जसा बापूजींचा तसाच शंकररावाचाही स्वभाव होता त्यातून त्यांचे सौजन्य आणि अगत्यवाद ठिबकत होता. पण त्या पदचिन्हांचा उपयोग मला काय हे एक प्रश्नचिन्हच हे सांगताना माझ्या पुढे उभे राहते !





# शंकररावांचा






१९३० साली महात्माजींनी दांडी प्रयाण केले. त्यांनी केलेल्या सत्याग्रहाने सारा देश खडबडून जागा झाला, इतर राष्ट्रात आणि राज्य कर्त्यांच्या मुलुखात आणि मनातही एक कुतूहल आणि कोडे निर्माण झाले. विदर्भात मिठाचा सत्याग्रह होऊ शकत नव्हता. गांधीजींचा हा सामुदायिक लढा देशव्यापी झाला पाहिजे, या युग पुरुषाच्या लढ्यात कोणीही मागे राहता कामा नये म्हणून बापूजी अणे यांनी आपले तात्विक भेद बाजूला सारून गांधीजींना, कळविले की 'माझे नाव आपल्या सत्याग्रहींच्या यादीत स्वयंसेवक म्हणून नोंदवा.'

खाऱ्या पाण्याच्या विहिरीतून पाणी आणावे, मीठ करावे आणि ते विकावे, जप्त वाड.मय जाहीरपणे वाचावे या प्रकाराने सरकार प्रभावित होईना. कोणासच पकडेनासे झाले.

बापूजी अणे हे स्वयंसेवक नव्हते. ते एक कल्पक, कुशल, संघटक असे थोर नेते होते. त्यांनी जंगलच्या सत्याग्रहाची कल्पना काढली. समुद्राकाठी मिठाचा सत्याग्रह तर इतरत्र सर्वदूर जंगल सत्याग्रह. विदर्भाचे बापूजी हे जंगलसत्याग्रहाचे अखिल भारताचे प्रणेते ठरले. हा सत्याग्रह प्रारंभी कोठे करावयाचा ? हे चिंतन चालू असता बापूजींनी हा सत्याग्रह धुंदीच्या 'अ' वर्ग जंगलात म्हणजे पुसदच्या जवळ ९ मैलावर करावयाचे ठरविले. पुसद हे पहिले आणि ते हे की येथे शंकरराव सरनाईक हे पुण्यपुरुष राहतात. त्यांच्या हाकेला ओ देणारी माणसे मिळतात, पैसा मिळतो आणि संयोजकांचीही वाण पडत नाही. अखिल भारताचे एक नेते म्हणजे बापूजी आणि त्यांचें विश्वासाचें पहिलें वहिले पुण्यक्षेत्र म्हणजे पुसद सत्याग्रहाचे शिबीर सुरू झाले. गुरूपौर्णिमेचा मुहूर्त ठरला. तत्पूर्वी आषाढी एकादशीलाच सारे स्वयंसेवक आपआपल्या गांवातून निघून शिबिरात दाखल झाले. बापूजींनी मतभेद बाजूला सारून गांधीजीचा सत्याग्रह हा एक राष्ट्रीय कार्यक्रम म्हणून स्वीकारल्यामुळे सारे अंतर्गत मतभेद आपोआपच नष्ट झाले आणि सारा वऱ्हाड मध्यप्रदेश एका राष्ट्रीय भावनेने उत्साहीत झाला. सर्व लहान थोर कार्यकर्ते पुसद मध्ये सम्मीलित झाले. पुसद ते धुंदी ८ मैल अंतरावर आषाढी पौर्णिमेला जणु माणसांची रीघ लागली. धर्म राजकारणाचे कुरूक्षेत्र म्हणजे पुसद असे भव्य स्वरूप या स्वराज्याच्या पहाटेला प्राप्त झाले. स्व. दुर्गाशंकर मेहता, खापर्डे, शिवाजीराव पटवर्धन, डॉ. ढोसर, कानडे शास्त्री, आदि झाडून सारे नेते आले, डॉ मुंजे आणि त्यांचे सहकारी कार्यकर्ते यांनी बापूजीनंतर दुसऱ्याच दिवशी सत्याग्रह केला. हा सत्याग्रह धूम धडाक्याने चालू असताना सर्वदूर या सत्याग्रहाचे लोण पोचले आणि जागजागी हा सत्याग्रहाचा लढा सुरू झाला



पहिल्याच दिवशी गुरुपौर्णिमेच्या मुहूर्तावर बापूजींनी सत्याग्रह केला. ते तुरुंगात गेले आणि त्यांना सहा महिन्याची शिक्षा झाली. भारतीय दंडविधानाचे ३७९ म्हणजे चोरीचे कलम बापूजींना लावण्यात आले. पूर्वसूचना देऊन हजारो माणसासमोर वाजत गाजत जावून कापलेले गवत आणि ती चोरी ? सरकार दिङ्मूढ झाले होते. गुन्हा कोणता लावावा हे कळेनासे झाले होते. पुढे त्यात सुधारणा होऊन ४१७ म्हणजे उत्तेजन आणि एक जंगलाच्या कायद्याचे कलम लावून सत्याग्रह्यांना पकडण्यात आले.

सत्याग्रहाच्या आंदोलनांत नेता आघाडीवर असावा लागतो हे एक तंत्र आणि तसेच काही मातब्बर लोक मागेही राखून ठेवावे लागतात. त्याप्रमाणे शंकररावजींचा क्रम कांहीसा मागून लागला. त्यावेळी तुरुंगात वर्गवारी नव्हती. डोंगरीच्या तुरुंगात टिळकांना, अंदमानात सावरकरांना तसेच सर्वदूर तुरुंगाचे कायदे होते. ते जाडे भरडे कपडे आणि तेच कदान्न ! शंकररावांना त्या अर्ध्या चड्डीत आणि तशाच कुडत्यात आम्ही अकोला तुरुंगात पाहिले. पोटात भडभडून आले. हे ब्रिटिश सत्ते, आमचे किती बळी हवेत ते घे, किती हाल करावयाचे ते आमचे करुन आपली आसुरी लालसा तृप्त करुन घे. पण शंकररावासारखा संत आधीच कोमलांगी, दासोपंत अयाचितासारखा अग्निहोत्र परंपरेतील तपस्वी विद्वान यांचा छळ नको करु ! शंकररावांना आणि दासोपंताना तुरुंगातील ते कदान्न मानवले नाही. आम्हाला हागवणी लागल्या. ते परकीय सरकार बदनामीला भीत होते. तुरुंगात या माणसापैकी कोणास मृत्यू आला तर ? या संबंधी सरकार सतत सतर्क असे. या देशभक्तांना तुरुंगात कुणाला मुदतीचे आत तर कोणाची अल्पशी मुदत संपताच सोडून देण्यात आले.

देशाच्या राष्ट्रीय जीवनाचे पोषण आणि संवर्धन करण्याकरता अहोरात्र झटणाऱ्या, जीवनाचे चंदन उगाळून जनता जनार्दनाला लिपित राहणाऱ्या महापुरुषाला तुरुंगवासाचाही भोग भोगावा लागला. त्यांचे तुरुंगात जाणे त्यांना किती कष्टाचे झाले हे त्यांनी कधीच कोणाला सांगितले नाही पण आम्हा पाहणारांना मात्र ते असह्य झाले, या सत्याग्रहाचे संचलन करणारे अनेक कार्यकर्ते पुसदमध्ये होते. पण यासाठी द्रव्य किती जमवावे लागले, ते कोठून आले. हे कोणासच माहीत नाही. ते कर्तृत्व शंकररावांचे ! या एका रुपयावर नांव कोणाचे ही तमाशातील जाहिरात नाही. पुसदच्या गंगेतून पाणी वाहते की पुसदकरांचे दान वाहते हे सांगणे कठीण ! या गंगाप्रवाहाला पावन भागीरथीचे स्वरुप देणारे भगीरथ म्हणजे शंकरराव सरनाईक.





# नमस्कारितो या शिवपार्वतीला



"तुम्ही संत मायबाप कृपावंत।
काय मी पतित कीर्ती वानूं।।"

# एक लाख माणूस :

## — शंकरराव सखाराम सरनाईक

डॉ. केशव शंकर डबीर

> " परोपकाराय वहन्ति नद्यः, परोपकाराय फलन्ति वृक्षाः
> परोपकारायदुह्नन्ति गावः परोपकाराय शरीरमेतद् ॥ "

भारतीय संस्कृतीनुसार पवित्र व मंगल असणाऱ्या श्रीफलाची (नारळाची) उपमा आदरणीय शंकर सखाराम उपाख्य नानासाहेब सरनाईक यांच्या बाह्यांगावरील साध्या व जाडजूड खादीच्या पोशाखाला पाहून द्यावीशी वाटते. नारळाला ज्याप्रमाणें रंग नाही, रुप नाही आकर्षक आकार नाही, पण आतमध्ये मात्र अमृततुल्य मधुर पाणी, तद्वतच प्रथम दर्शनी त्यांच्या संबंधी आकर्षणाचा अभाव होऊन अनुकूल मत होणार नाही. पण प्रसंगानुसार त्यांचा सहवास घडलाच तर नानांच्या अंतरंगाचा, त्यांच्या हृदयाचा ठाव घेतल्यास, सात्विक आनंद देणारा अमृततुल्य झरा अविरत्पणे वाहात असे असा माझ्याप्रमाणेच त्यांच्या सहवासात आलेल्या अनेकांना अनुभव आलेला आहे.

सार्वजनिक कामाच्या सल्लामसलतीसाठी नाना आमच्या बैठकीत आमच्या तीर्थरुपाशी-अण्णाशी- तासन् तास मनमोकळेपणाने बोलत असत. चर्चा करीत व निर्णय घेऊन कार्याला लागत असत. पुसद आणि वाशीमचे राजकारण, समाजकार्य आमच्या समोरच्या बैठकीतच चर्चिले जात असे. पुसदला परत जातांना अत्यंत आपुलकीने प्रेमाने नाना आमच्या घरातील सर्वांची चौकशी, विचारपुस करीत असत. आमचे अण्णा कडक, करारी पक्षनिष्ठ तर नाना इतर पक्षाबद्दल सहानुभुती बाळगून परपक्ष सहिष्णुता बाळगणारे होते. आप्ताप्रमाणेंच इतरांना सुद्धा आपल्यापासून ही त्यांची

विचारधारा होती. नव्हे हा त्यांचा स्थायीभाव होता. गंगाजल किंवा सुमनगुच्छ ओंजळीत घेतल्यानंतर आपला सुगंध देत असतांना हा डावा हात हा उजवा हात असा आप-परभाव सुमने ज्याप्रमाणें करीत नाहीत तद्वत नानांचे सुमन सुख देण्यासाठी मार्गदर्शन करीत असतांना आप-परभाव न ठेवता सदा सिद्ध असे. असे करीत असतांना त्यांना अनेक वेळा झीज सोसावी लागली, तर कधी कधी आप्तांचे नुकसान झाल्यामुळे दोषारोप सहन करावे लागले. पण टीका टिपणीचा अथवा प्रशंसेचा त्यांच्या साधु-मनावर कधीच परिणाम झाला नाही. कारण "सुखदुःखे समे कृत्वा लाभा लाभौ जया जयौ" अशा स्थितप्रज्ञ सत्पुरुषामध्ये त्यांची गणना होती.

नानांच्या जीवनातील कांही स्मृती मी माझ्या हृदयांच्या कप्पात जतन करुन ठेवल्या आहेत. या लहानशा लेखांत त्या सर्वांचे वर्णन करणें अशक्यप्राय आहे. तथापी त्यांच्या जीवनातील माझ्या शेवटच्या अनुभवाची घटनास्मृती उल्लेखल्याविना मला समाधान लाभणार नाही.

ज्या वत्सगुल्म (वाशीम) नगरीत नानांच्या जीवनाचा बराच मोठा कालखंड गेला, ज्या ग्रामदेवतेच्या, श्री. बालासाहेबांच्या कृपेने त्यांनी वैयक्तिक तथा सार्वजनिक कामगिरी यशस्वी रीतीने पूर्ण केलीं, त्या वत्सगुल्म रजःकणांचे, त्या श्री. बालासाहेबांच्या चरणाचे शेवटचे दर्शन घेण्याचा त्यांच्या मनाने, त्यांच्या वृद्धावस्थेत ध्यास घेतला. वृद्धावस्थेमुळे शरीर गात्रे क्षीण-अती क्षीण- झालेली होती. मन स्वाधीन पण शरीर पराधीन अशी अवस्था झाली होती. अर्थात अशाही कठीण परिस्थितीत त्यांच्या इच्छेनुसार खास मोटारीची व्यवस्था करुन पुसदहून त्यांना फुलाप्रमाणें वाशीमला व्यवस्थित आणले गेले.

वेळ सायंकाळची श्री बालाजीचे दर्शन घेतल्याने त्यांच्या नेत्र द्वयामधून समाधानाश्रू ओसंडत होते. दोघातिघांच्या सहाय्याने ते आमच्या बैठकीमधील तक्तपोसावर विश्रांती घेत होते. अनेक लोक त्यांच्या भेटीस येऊन विचारपूस करुन जात होते त्यांची स्मृतिशक्ती क्षीण झालेली होती. अशाही परिस्थितीत मला त्यांच्या उदार मनाचे, मोठ्या मनाचे साधुमनाचे



दर्शन झाले. वाशीमला पूर्वी राहात असतांना त्यांचा एका व्यक्तीशी मोठ्या प्रमाणात वाद झाला होता. त्यांच्याशी अनेक वर्षापासून अबोला होता. ( त्या व्यक्तीचे नाव माहीत असूनही मी प्रसिद्ध करु शकत नाही. ) त्या व्यक्तिबद्दल त्यांनी मोठ्या आत्मीयतेने चौकशी करुन त्यांच्या चरितार्थ साधनाबद्दल विचारपूस केली.

मित्र सगेसोयरे यांच्याबद्दल विचारपूस करुन क्षेम समाधान माहीत करुन घेणें हे सामान्य मानसाचे लक्षण झाले. पण अनेक वर्षापूर्वी मतभेदाने विरोध झालेल्या व्यक्तिबद्दलची आपुलकीने चौकशी करण्याचा, त्यांच्या मनाचा मोठेपणा मी प्रत्यक्ष अनुभवला आहे. व सामान्यातील असे असामन्यत्व पाहिले आहे.

आकाशात निरनिराळ्या रंगाचे, निरनिराळ्या आकाराचे अनेक ढग दिमतात पण तृषार्तांची तृष्णा शमविण्याचे कार्य केवळ काळे ढगच करु शकतात; त्याप्रमाणें समाजात अनेक वृत्तीचे, गुणांचे लोक, जरी पुढारी म्हणून वावरत असले तरी काळ्या ढगाप्रमाणें समाजाची खरी तृष्णा शमविण्याचे कार्य म्हणजे नानांचा स्वभावधर्मच झाला होता. पुसद मधील अनेक सार्वजनिक संस्थांशी त्यांचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष संबंध आला होता. किंबहुना सरनाईक म्हणजे पुसदचे सार्वजनिक काम हे एक समीकरणच होऊन बसले होते. घरसंसार सांभाळून समाजाचा संसारही यशस्वीपणें नाना करु शकले. ते आतिथ्यशील होते. असा एकही दिवस जात नसे की ज्या दिवशी कांही कार्यकर्त्यांची भोजनाची पाने नानांच्या पंक्तीला नाहीत आणि ही सर्व आतिथ्यशीलता त्यांच्या सहधर्मचारिणी सुगृहिणी सत्याकाकूंच्या सक्रीय सहकार्यामुळेच. त्या माऊलीनें नानांचा समाजकार्याचा शकट व्यवस्थित चालविण्यासाठी आमरण अविश्रांत श्रम केले.

नानांना कोणतेच व्यसन नव्हते. त्यांना निर्व्यसनी पणाचेच व्यसन होते असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. पोशाख साधा व स्वदेशी. जेवणही साधे-खाण्यात साखर नाही पण साखर न खाणारा मनुष्य इतका गोड कसा बोलत असे यांचे मला गूढ उकलले नाही.

नाना सांगत असत "कर्म, परमेश्वराची पूजा आहे. अहंकार नाशातच मन:शांती असते; डोके व अंत:करण यात द्वंद सुरु झाले असता अंत:करणाचा विजय होण्यातच खरे कल्याण असते."

नानांच्या जीवनाचे अनेक पैलू अभ्यासून ते मला अनुकरणीय वाटतात. रामायणाचे सारे सार 'आदौ राम तपो वनादि गमनम्' या एकाच श्लोकांत समाविष्ट आहे असे सांगतात त्याप्रमाणें नानांच्या जीवन कार्याचे सार पुढील वाक्यांत समावलेले आहे. 'कापरात सुवास, साखरेत गोडी, गुलाबाच्या फुलांत सुगंध व रत्नात ज्याप्रमाणे तेज समाविष्ट असते त्या प्रमाणें निरहंकार, राष्ट्रप्रेम, सक्रीय समाजकार्य, आतिथ्यशीलता व प्रसिद्धपराङ्मुखता आदी सद्‌गुण नानांच्या जीवनांत समाविष्ट झालेले होते.

अशा या आदरणीय अलौकिक व्यक्तिमत्वाने माझ्या हृदयांतील संवेदनांना सदैव प्रभावित केलेले आहे. आपल्या समाजाच्या उन्नतीसाठी, देशाच्या स्वातंत्र्यासाठी आमरण अविश्रांत श्रम करणाऱ्या, नंदादीपाप्रमाणें स्वत: जळून शांतपणें अखंड प्रकाश देऊन मार्गदर्शन करणाऱ्या श्रद्धेय स्मृतीला माझे शतश: नम्र अभिवादन.

त्यांची स्मृति नंदादीपाप्रमाणें मार्गदर्शन करणारच म्हणून–

हा अखंड नंदादीप। जळणार सतत जळणार,
हा असाच तेवत जगती। नित प्रकाश मज देणार.





# एक जीवनोपासक कर्मयोगी

–प्रा. बा. दा. जोशी, उमरखेड

एकोणविसाव्या शतकाच्या उत्तरार्धात भारतात जे वैचारिक परिवर्तन सुरु झाले. त्यामुळे चिपळूणकर लो. टिळक, आगरकर यांच्या प्रभावाने गाजलेल्या पुण्यास एका वैचारिक केन्द्राचे महत्व प्राप्त झाले होते. या काळातील तरुणवर्ग ध्येयवेडाने भारुन काही तरी नवीन, चैतन्यमय व लोकसेवेचे काम करावे या हेतुने झपाटलेला असे. स्व. शंकररावजी सरनाईक यांचे मॅट्रीकपर्यंतचे शिक्षण पुण्यास झाले. त्यामुळे त्या वातावरणाने मंत्रमुग्ध झालेला हा तरुण केव्हाही स्वत:पुरतेच पाहणारा निर्माण होणे शक्य नव्हते. देशभक्तीच्या कारखान्यातून तयार झालेला पक्का माल आपापल्या परिसरात वैचारिक जागृतीसाठी जे जे शक्य आहे ते ते करावयास अव्याहत सिद्ध असे. अनेक पदवीधर आपल्या स्वदेशाभिमानामुळेच सरकारी नोकरीस अपात्र ठरले. त्यापैकी शंकररावजी सरनाईक हे एक होते. लो. टिळकांच्या जहाल मतवादी विचारसरणीचा प्रभाव पडलेला तरुण तर विलक्षण ध्येयवादी असे. एखाद्यावेळी घेतलेले व्रत किंवा प्रतिज्ञा शेवटपर्यंत टिकविण्यासाठी त्यांचा सतत प्रयत्न असे. लो. टिळकांना १९०८ साली जेव्हा शिक्षा झाली त्यावेळी जाहीर सभा घेऊन सरकारी अरेरावीचा निषेध म्हणून हरताळ पाडणे, बहिष्कार घालणें इ. कामे शंकररावांनी या परिसरांत लोकनायकांच्या सहकार्याने केली.

शासनाविरुद्ध काम करावयाचे म्हणजे अर्थसामर्थ्याबरोबर शरीरसामर्थ्यही हवे. या भूमिकेने वाशीम येथे शंकररावजींनी व्यायामशाळा चालविली होती. हे कार्य किंवा स्वदेशी व्रताची चळवळ सहकारी मित्राशिवाय यशस्वीरीत्या चालविणे अशक्य आहे हे ओळखून त्यांनी लोकसंग्रह फार मोठा व शिस्तबद्ध रीतीने केला होता. लोकांचा विश्वास लोक नेत्यांनी

संपादन करणे आवश्यक असते. सभाजसेवा संस्था स्वराज्यात अनुदानाने चालतात.. पण गुलामगिरीत लोकाश्रयावर संस्था, संघटना यांचा व्याप सांभाळणे म्हणजे सर्व कारभार–व्यवहार चोख असावा हे त्यांच्या स्वभावाचे एक व्यवच्छेदक अंग बनले होते. एकदा एका कामासाठी खर्च झाला नाही तर ती त्यांची वर्गणी त्यांना परत करणे हा त्यांचा बाणा असे म्हणूनच शंकररावांचा शब्द खाली पडत नसे. जीवनविषयक श्रद्धा. उत्कटता व निष्ठा यातूनच लोकसेवेचा स्त्रोत त्यांच्या मनात निर्माण झाला. त्यांनी ध्येयवादी परंपरेचे डोळसपणे परिशीलन करुन आपला स्वतःचा दृष्टीकोन बनविला व त्याचे व्रत चालवीत होते.

पुसद येथे आल्यावर सार्वजनिक कामात भाग घेतांना जे जे करणे शक्य आहे. त्यामध्ये सभा-संमेलने घेणे हा त्यांचा छंद झाला होता. राष्ट्रीय प्रवृत्तीने सुरु झालेल्या गणेशोत्सवाच्या परंपरेच्या समृद्धतेसाठी उमरखेडसाठीही त्यांचा प्रयत्न असे. उमरखेडातील श्री आईनाथ संस्थानात जे विद्यार्थी-छात्रालय होते त्यामध्ये गणेशोत्सव साजरा होई त्या मंडळात शंकररावजी स्थानिक लोकांबरोबर विशेषत्वाने भाग घेत असत. गणेशोत्सवा-बरोबरच सरस्वतीच्या उपासनेसाठी वाचनालय काढणे हाही एक उद्योग सुरु झाला होता. लो. टिळकांच्या प्रभावळीतील नेत्यांनी आपल्या विचार प्रतिपादनार्थ एकेक वृत्तपत्र चालविले होते. शंकररावांचे हे स्वप्न असावे. त्यांच्या या महत्वाकांक्षेची परिपूर्ती पुसद मध्ये निर्माण झालेल्या साप्ताहिकाने झाली आहे.

वाशीम सोडून आपले वास्तव्य पुसद येथे शंकररावजींनी सुरु केले तरी वाशीमकडे होणाऱ्या चळवळीत त्यांचा महत्वाचा भाग असे पद्मतीर्थाचा लढा असो, १९२७ चा हिंदु मुसलमानांचा दंगा असो, वाशीम येथील कोणतेही सार्वजनिक समारंभ असोत, किंवा निरनिराळ्या संस्थांना त्यांनी देणग्या दिलेल्या असोत, यावरुन त्यांची ओढ कमी झालेली नव्हती असे वाटते. वाशीमच्या मागच्या पन्नास वर्षापूर्वीच्या सांस्कृतिक परंपरेत नानाचा मोठाच वाटा होता हे मान्य करावे लागेल.



पुसदला जे सांस्कृतिक व सामाजिक कार्य स्वातंत्र्यपूर्व काही दशकांत व स्वातंत्र्योत्तर काळात झाले त्याची बीजे शंकररावांच्या हस्ते पेरली गेली होती असे म्हणावे लागेल. एकदा विदर्भ साहित्य संमेलनाचे अधिवेशन घेऊन पुसदकरांची साहित्यभक्ती अभिव्यक्त झाली असे त्यांना वाटले नसावे यावरुन विदर्भ साहित्य संमेलनाचे रौप्य महोत्सवी अधिवेशन पुसदला घेण्यात आले. लो. टिळक, खाडिलकर, तात्यासाहेब केळकर इ. या परिसरात आणून त्यांची भाषणे वेळोवेळी आयोजित करण्यात नानासाहेबांची योजकता दिसून येई.

या सर्व कार्यात श्री. शंकररावांची भूमिका महत्वाची असली तरी घरातील जबाबदारी सर्वस्वी त्यांच्या पत्नीने स्विकारलेली होती. पतीच्या, पुत्रांच्या मोठेपणात आनंद मानणे, त्यात मनस्वी समाधानी होणे हा काकूंचा स्वभाव साधुत्व यापेक्षा वेगळे असून शकत नाही घरात अडचणी असो वा नसो स्वतःच्या मुलाबरोबर येणाऱ्या सवंगड्यांना त्या खाऊ देतीलच ' संपले ' असे म्हणण्याची त्यांना चीड असावी. नानांचा गृहस्थाश्रम हा संत एकनाथांच्या गृहस्थाश्रमाप्रमाणे होता. त्यामुळे राजकारण वा समाजकारण याबद्दल जरी या उदासीन असल्या तरी खाजगी बैठकीत क्वचित चर्चा निघा-ल्यास त्यांचे प्रचलित घटनेवरील भाष्य मार्मिक असावयाचे, मार्गदर्शक असावयाचे. कारण श्री. शंकररावांच्या जीवनात नियमीतपणाचे सातत्य टिकविण्यासाठी काकू काळजी घेत असाव्यात. आज एखादा समाजसेवक किंवा राजकीय पुढारी व्याख्यानासाठी जात असेल तर तो अर्धातास एकतास उशीरा जातो. परंतु समर्थांनी उत्तमपुरुष लक्षणात वर्णन केल्यानुसार वेळेवर कार्यक्रमास उपस्थित राहण्याबद्दल त्यांचा कटाक्ष असे सर्व कार्यक्रमाचे सूत्रधार स्वतः राहूनही पुन्हा ' इदं न मम ' असे म्हणण्यासाठी मनाचें केवढे औदार्य लागते याचा सध्याच्या जाहिरातयुगात पत्तासुद्धा लागणार नाही. 'जोडूनिया धन उत्तम व्यवहारें । उदास विचारें वेच करी' हीच त्यांची खरी दृष्टी होती. सामाजिक, कौटुंबिक समस्या सोडविण्यासाठी मग्न असणारे शंकररावजी नेहमी प्रसन्न कसे राहत याचा उलगडा सहजासहजी होणे शक्य नाही. त्यांनी आपल्या मवाळ स्वभावानें व मंजुळ वाणीनें व मधुर कृतीने समाज मानस

शिकले होते. ते नेहमी मधुर बोलत, नम्र बोलत, 'मना सर्वथा नम्र वाचे वदावे' याचा जणू त्यांनी ध्यासच घेतला होता. त्यांना त्यामुळे माणसे व त्यांची मने जोडता आलीत. जोडणे त्यांना माहित होते. त्यासाठी वेगळी खटपट करावी लागत नसे. तो त्यांचा स्वभाव बनला होता. प्रतिकूल परिस्थितीतही आपला जीवनातील आशावाद टिकविण्याचा त्यांचा बाणा होता. या झुंजार प्रवृत्तीमुळेच ते खरे समाज सेवक, कर्ते सुधारक होऊ शकले. रुढ वैवाहिक जीवनात रमलेले तरुण, किंवा सरकारी नोकरीच्या माध्यमातून पैसा कमाविण्याची महत्त्वकांक्षा बाळगणारे सुशीक्षित काही त्यावेळी कमी नव्हते परंतू कर्मयोगरहस्य जाणलेल्या व्यक्तिमत्वास अशा रुढ जीवनात समाधान मिळणे शक्य नव्हते.

जीवनातील विविध समस्यांची वेळोवेळी त्यांनी जितकी काळजीपूर्वक सोडवणूक केली त्यापेक्षा सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय पातळीवरील समस्या सोडविण्यात त्यांचे आयुष्य जास्त खर्ची पडले आहे. लोकापवाद येवोत किंवा कांहीही होवो आपण आपले काम सोडावयाचे नाही असा जणू 'फुटो हे मस्तक, तुटो हे शरीर, परी नामाचा गजर सोडो नये' या तुकाराम वचनानुसार त्यांचा ध्येयवाद होता. जीवनाचे हालाहल पचविणारा हा शंकर कधीच विषवल्लीप्रमाणें वागला नाही. जीवनाचे हालाहल पचवून लोकांना लोकसेवामृतगंगा उपलब्ध करुन देणारा जणू हा शंकराचा नवा अवतारच होता असे वाटते. मग ही सेवागंगा त्रस्त जीवांना, प्राणिमात्रांना सहाय्य केल्याशिवाय कशी राहू शकेल ? सत्संग व सज्जनसेवा या बरोबरच सामान्यांची सेवा करणारा हा असामान्य माणूस लाख मोलाचा होता. 'सज्जनसंगतिरेका । भवति भवार्णव्-तारण-नौका' या प्रमाणे त्यांचा सेवाभाव होता. म्हणून शंकररावजींची नि:स्पृहता, त्यांचा निस्वार्थीपणा त्यांचे संयमी वागणे, त्यांचे मधुर बोलणे, निश्चयी आचरण, निरलस सेवाभाव, डोळस विवेकीपणा, प्रसिद्धीपराङ्‌मुख दातृत्व, व निरहंकारी व्यक्तिमत्व याबद्दल लिहावे तितके थोडेच वाटेल ! शेवटी जनतेची सेवा हीच प्रभुसेवा या भावनेनें त्यांनी 'जीवतळीं आंथरिती । जीव आपुला' या वृत्तीने आपल्या प्राणांच्या पायघड्या दुसऱ्याच्या सुखासाठी घालणारे ते एक कर्मयोगी होते असे म्हणावे लागेल.





# — अपरिग्रह वृत्ती —

या आठवणीच्या संदर्भातच, फार मोठा कालखंड ओलांडून मी १९५१ सालाकडे वळतो. कालविसंगतीचा दोष मान्य करतो, पण दानत आणि अपरिग्रह या गुणांच्या संदर्भात मला सुसंगत वाटते म्हणूनच ती या ठिकाणी नमूद करतो. शंकररावजींचा सत्कार त्यांच्या एकसष्टीच्या निमित्तानें १९५१ साली झाला. तो ते स्वीकारतीलच अशी खात्री वाटेना. त्यांची संमती घेण्याचें धैर्य कोणासच होईना. वाशीमहून दे. भ. अण्णासाहेब डबीर आलें. त्यांचा स्वभाव कणखर आणि निर्धारिक, ते म्हणाले, 'नाना, अमूक दिवशी तुम्ही गांवातच राहिले पाहिजे. परस्परांचा भ्रातृभाव अनुपम असल्यामुळे शंकररावांनी संमती दिली. हा फार मोठा विजय म्हणून अण्णासाहेबांना आम्ही अनेकांनी धन्यवाद दिले. सत्काराची सिद्धता सुरू झाली. काही निधी अर्पण करण्याचा संकल्प सुटला. खादीची वस्त्रे आणली. स्व, बियाणीजींच्या मार्फत एक काश्मिरी शाल आणली. सौ. काकूंसाठी खण आणि लुगडे आणले. मानपत्रासाठी चांदीचा करंडा आणि तो ठेवण्यासाठी दोन रुपयाचे एक लाकडी विमान आणले. सत्कार समारंभाला कै. वीर वामनराव जोशी, हरिहरराव देशपांडे, आ. बॅ. रामराव देशमुख, आचार्य दादा धर्माधिकारी आले. सर्वांची गौरवपर भाषणे झाली. श्री शंकरलालजींच्या चित्रपट गृहात झालेल्या या समारंभात व्यासपीठावर शंकररावांच्या गळ्यात पडलेल्या गाडाभर हारांचा हिमालय उभा राहिला. शंकररावांनी टेहळणी करुन त्यांना निधी किती दिला जाणार याचा अंदाज घेतलेला असावा. कारण समारंभात नानांच्या तीन सुपुत्रांपैकी मधले, डॉ. भाऊसाहेब सरनाईक उठले. 'अध्यक्षांना म्हणाले की मला दोन मिनिटे बोलण्याची

परवानगी द्या.’ ती दिली गेली आणि चि. भाऊसाहेब काय म्हणाले म्हणतां ? ‘आमच्या वडिलांचा आपण सर्वांनी गौरव करून त्यांना निधी अर्पण केला त्याबद्दल आम्ही बंधुत्रयकृतज्ञ आहोत. त्या निधीत आमचे हे पत्र पुष्प स्वीकारा आणि समाविष्ट करा.’ असे म्हणून या भाऊरावांनी पांच हजार रुपयांच्या नोटांचे पाकीट अध्यक्षांचे हातीत दिले. समारंभात एक प्रकारचे थ्रिल निर्माण झाले.

समारंभ संपवून परत जाताना, त्यावेळचे सिव्हील जज्ज श्री जाधव साहेब वाटेत उभे राहून म्हणाले ‘काहो, त्या ब्राम्हणाला पांच हजार रुपये दंड केला तुम्ही ? हा सत्कार की शिक्षा ? त्यांचें हे दान म्हणजे त्यांच्या अपरिग्रहाचा एक आगळाच प्रकार पाहून सारे थक्कच झाले. दिलेली देणगी स्वत: न वापरता, तिचा विनियोग राष्ट्रकार्यार्थ केला जावा हे ठीक आहे पण त्यात तितकीच भर आपण घालावयाची हा प्रकार अघटितच नव्हे काय ? त्यांना बाधणशेरुपये निधीं अर्पण करण्यात आला होता त्यात त्यांनी पाच हजाराची भर घातली.

## : ही कथा येथेच संपली नाही :

आमच्या पूज्य नानांनी आपली वस्त्रे, शालीसह दुकानात नेऊन विकली. घड्या मोडल्याच नाही. सौ. काकूंचे पण ! चांदीचा करंडा विकला. खाली लाकडी विमान फक्त दोनच रुपयाचे होते ते मला दिले आणि मला याचे पैसे आणून दे अशी मला आज्ञा केली. ते नेले, एका मित्राच्या घरी मुलाच्या पाळण्यात लटकविले व नानांचें हातात दोन रुपये टाकले आणि म्हणाले, गाडाभर फुलांचे हार ! किती पैसे वाया घालतेतरे तुम्ही ! ते विकून त्याचे पैसे करता आले नाहीत हे त्यांचे



जिवाला दुःख ! सारा पैसा त्या निधीत जमा केला. तो सारा निधी सार्वजनिक कामातच खर्च केला. या अपरिग्रहाला कोणती उपमा द्यावी हे मला तरी सुचत नाही. ‘पद्मपत्रमिवांभसा’ वृत्ती शिखराला पोचलेली नानांच्या गृहस्थाश्रमी जीवनांत आम्ही अनेक निकटवासियांनी जवळून आणि सतत पाहिली. हे सांगतांना, हेही खरे सांगून टाकलेले बरे की या वृत्तीचा अंशमात्र स्पर्श मी मला होऊ दिला नाही. मी तर असे म्हणतो की आईने लहानपणी मुलास भरवावे तसे नानांनी मी वयाने मोठा झालो हे विसरुन जन्मभर मला भरविले. याचा अभिमान वाटत असला तरी असे त्यांनी कित्येकांना भरविले हे कोणास माहीत नाही. या कानाचे त्या कानाला कळणार नाही अशी गुप्तता आणि अशी प्रसिद्धी विमुखता. आंतरात्म्याच्या तुष्टी वाचून लौकिकातील कोणताही गाजावाजा ज्यांनी संयमपूर्वक जन्मभर टाळला असे पाहिले आणि शेवटचे शंकरराव आणि शंकररावच. त्यांच्या सहकारी स्नेह्याचा भाऊ कोषटवारांचा द्रव्यदानाच्या संदर्भात हाच नमुना.

लोकनायक बापूजी अणे एकदा म्हणाले ‘शंकररावांसारखा ब्राम्हण उभ्या महाराष्ट्रात शोधूनही सापडणार नाही.’ शंकररावांच्याच बैठकीत कोणाशी तरी ते नाना संबंधी जिव्हाळ्याचे उद्‌गार म्हणून बोलत



# पुण्यस्मरण !

म. या. गांधे, उमरखेड

स्व. शंकररावजी सरनाईक यांचा जन्म १८८४ मध्ये व मृत्यू १९६६ मध्ये झाला. एकोणीसाव्या व विसाव्या अशा दोन्ही शतकातील एकूण ब्याएंशी वर्षांचा कालखंड त्यांनी अनुभविला. पू. साने गुरुजींच्या भाषेत बोलावयाचे म्हणजे भारतीय संस्कृती पांढऱ्या केसाला फार मान देते याचे रहस्य अनुभवातच आहे. कारण पांढरे केस होणे म्हणजेच अधिकाधिक आयुष्याचा अनुभव जमेला असणे. व अनुभव म्हणजेच ज्ञान. म्हणून वृद्ध मनुष्य ज्ञानी असतो अशी भावना. त्यामुळे त्यांस नमस्कार. वंदनीय शंकररावांचे आयुष्य देखील पू. साने गुरुजींच्या निर्मळ आयुष्या सारखेच !

दीन-दुबळ्या, दलितांच्या सहवासात राहून त्यांची 'आई' होण्यात साने गुरुजींनी धन्यता मानली. गरीब विद्यार्थ्यांना स्वतः हाताने स्वयंपाक करून भरविले व त्यांच्याच प्रगतीसाठी आपले आयुष्य चंदनासारखे झिजविले. तोच सुगंध दे. भ. शंकररावांच्याही आयुष्याला होता असे दिसून येतें. साधवो न हि सर्वत्र। चंदनं न वने वने ॥ ह्या उक्तीप्रमाणे खरोखरच शंकरराव सरनाईकांसारखी पावन माणसे काळानेंच मुद्दाम दिली असावीत. त्यांच्या रूपाने जीवनाचा आदर्श समाजापुढे उभा करून ठेवला असावा असे वाटते. प्रा. अनंत काणेकरांच्या 'दोन मेणबत्त्या' ह्या लघुनिबंधाची आठवण ह्यावेळी होते. 'स्वतःसाठी जगलास तर मेलास, दुसऱ्यासाठी जगलास तरच जगलास' असा त्याचा मतितार्थ आहे. केवढे थोर तत्त्वज्ञान त्यात भरलेंले आहे ! प्रातःस्मरणीय व्यक्ती त्यांच्या पुण्यस्मरणाने आपणास समाधान देतात. त्यांच्या नामस्मरणात देखील नादमाधुर्य असते, तसेच हे आमचे शंकररावजी सरनाईक ! त्यांचे पुण्यस्मरण आज त्यांच्या पुण्यतिथीदिनी आपणा सर्वांना सुखकर होवो हीच सदिच्छा !

३० ऑगष्ट १९७५



# सात्विक शंकररावजी

गं. व. पांडे हिवरा

सात्विकता साकार झालेली मी पाहिली ती दे. भ. शंकररावांच्या रुपांतच ! स्वातंत्र्योत्तर कालात सत्तेची स्पर्धा कळसाला पोचलेली दिसत असली तरी पूर्व कालातही नेतृत्वाच्या स्पर्धेत आमची शक्ती कांही कमी क्षीण झाली नाही याचे भूतकालात शिरून पाहू जाता, स्पर्धांचा विसर पडतो आणि त्या काळात शंकररावांच्या सात्विकतेचाच ठसा अंतःकरणात उमटलेला दिसू लागतो.

कॉंग्रेस कमेटचा ताब्यात घेण्याकरता त्यावेळी अहमहमिका होती. सभासदांची संख्या वाढवावी व कॉंग्रेस कमेटी ताब्यात घ्यावी अशा धावपळीत पुसद तालुका कॉंग्रेस कमेटी आम्ही मिळविली. पण त्यावर लगेच अपील व्हावयाचे वरच्या पातळी वरचा निकाल ठरल्याप्रमाणे आमच्या विरुद्ध लागला. जे त्यावेळी भाऊबंदकीची अशी भांडणे भांडत होतो तीच माणसे म्हणजे आम्ही सारे एकमेकांशी अभिन्नत्वाने वागत आहो पण त्यावेळी कॉंग्रेस कमेटी सोडावी लागली. अध्यक्ष होते शंकररावजी. एकबोटे सेक्रेटरी होते. निधी जवळपास तीन हजार रुपयांच्यावर होता. तो कांही प्रतिपक्षाच्या ताब्यात देववेना 'मला कोणी तुरुंगांत टाकले तरी मी जाईन पण पैसा यांना देणार नाही' असा व्यवहारी

हट्ट एकबोटे यांचा होता, आमचे सत्वसंपन्न नेते शंकररावजी त्यावेळी आजारी होते. त्यांचे मन जसे अतिशय मृदु तसेच त्याचे शरीरही अतिशय कोमल होते. जेव्हा जेव्हा आजारी पडत तेव्हा तेव्हा धीर सुटत असे.

असेच रूग्णशय्येवर असताना, शंकररावांचा एकच ध्यास ! कॉंग्रेसचे पैसे देऊन टाका. हो हो, नाही नाही, करावे तरी किती वेळ ? हे संत हृदय सारखे विव्हळत होते आणि उद्गार एकच, पैसे देऊन टाका आणि मग, पैसे खर्ची घालणे, सार्वजनिक कामातच विनियोग करून त्यांचे हिशोब तेवढे ताब्यात देणे हे जे आपसी लढ्यातील छक्के पंजे ते आम्हास करता आलें नाहीत. त्यांची रूग्ण शय्येवरील एकच एक आज्ञा म्हणा की मागणी म्हणा, ती जर पूर्ण झाली नाही तरी या मानव स्वरूपात देवात्म्याला अत्यंत क्लेश होणार या जाणिवेने आम्ही त्यांना सांगितलें 'पैसे देऊन टाकतो निश्चित असा, आपल्या शब्दा बाहेर आम्ही कोणी जाणार नाही' त्यांना उसंत वाटली आणि खरे म्हणजे त्या सात्विकतेच्या सहवासाने तो संस्कार आमच्याही अंतःकरणात दृढमूल झाला. त्यांनी उपदेशापेक्षा, आदेशावाचून पण स्वतःच्या सदाचरणाने अनेकांस अनेक गोष्टी शिकविल्या, त्यातल्या माझ्याही वाट्याला कांही आल्या त्यापैकी वानगीची म्हणून एक घटना आठवली. तीच या निमित्ताने, माझे स्मृतिपुष्प म्हणून त्यांचें चरणी समर्पण करीत आहे.





# शंकररावांच्या नंतरचे

## एक गुण विशेष

जे गुण विशेष एका मोठ्या माणसाच्या चिरवियोगा-नंतर त्यांच्या कुटुंबात अभावानेंच आढळतात. असे काही गुण-विशेष शंकररावांच्या विद्यमान कुटुंबीयात ठळकपणे पहावयास मिळतात. नेत्याची परंपरा एका घराण्यांत सातत्यानें टिकत नाही, स्व. पं. मोतीलालजी नंतर जवाहरलाल नेहरू क्वच्चितच अपवाद म्हणावयाचे. शंकररावांच्या तीन सुपुत्रांत नेतृत्वाचा वारस दिसण्या-सारखा नसला तरी आमच्या नानांनी आपले विविध गुण या तिघात वाटून दिलेले दिसतात. त्यांचे मोठे चिरंजीव श्री दिगंबरराव हे नानांसारखे साधे, बटु मूर्ती पण स्वभावानें सालस, अनेकांच्या विश्वासाला पात्र झालेले आणि अनेकांची कामे मुक्याभ्याने करण्यात सदैव तत्पर असतात. निर्द्वेष बुद्धीने सर्वांना ओळखून पण सर्वांचे सख्यानुसंधान कायम ठेवून सौजन्याने वागतात. त्यांचे वर कोणाची नाराजी, त्यांची कोणी निंदा केल्याचे कधीही ऐकिवात येत नाही. दुसरे चिरंजीव डॉ. भाऊसाहेब सरनाईक ही एक पुसद शहरातील शक्ती आहे असे म्हणता येईल. मा. वसंतराव नाईकांचें निवडणूक कार्यालय त्यांनी सांभाळले होते. स्वतःच्या मिळकतीमधून विदर्भाच्या आंदोलनात किती पैसा वेचला असेल याचा कोणालाही मागमूस नाही. ज्वालामुखी चालवितांना, त्यांनी आपल्या प्रामाणिक बुद्धीने जे धोरण ठरविले त्याशी प्रतारणा न करता, ज्वालामुखी जिद्दीने चालविला हे सुपरिचित आहे. त्यांच्या कर्तृत्वाचा ताजा अनुभव म्हणजे नुकतीच गाजलेली नगर परिषदे-ची निवडणूक. त्यांच्या प्रामाणिक बुद्धीनें जे पटले ते त्यांनी केले

आणि सिद्धीस नेलें, मते कोणाची पटोत वा न पटोत. स्वतः करता कांहीही न मागता, लोकांचे काम, लोकांकरता करावे आणि ते लोकांनाच वाटून द्यावे, मी कोणी नव्हे, माझे कांहींही नाही आणि मला काहीही नको हा निरभिलाषतेचा स्वभावधर्म शंकररावांचा जसा दादा मध्ये वेगवेगळया क्षेत्रात दिसतो तसाच तो राजकीय क्षेत्रात भाऊसाहेबातही. तिसरे चिरंजीव यशवंतराव. भागानगर सत्याग्रह १९३९ साली चालू होता. शंकरराव त्यावेळी एकदा उमरखेडात आले आणि पैनगंगेच्या तीरावरही आमच्या सोबत आले परत आल्यावर म्हणाले 'अरे आमचा यशवंता गेला की या सत्याग्रहात,' आधी मागमूस नाही. अचानक यशवंतराव गेल्याचें कळले. यशवंतरावांच्या दुर्दैवाने त्यांना तारुण्यातच विधुरावस्था प्राप्त झाली कांही प्रेमी जनानी त्याना पुन्हा संसार थाटण्याचा सल्ला दिला. पण तो त्याना मान्य झाला नाही. भाऊसाहेबांची राजकीय जीवनातील बैठक वेगळी, यशवंताची वेगळी आणि दादांची सर्वभूती समानता.

दिगंबररावांना लाभलेली पत्नी म्हणजे दादांच्या मातुश्रींच्या पदचिन्हांकित भूमीकडे पाहून चालणारी एक दक्ष सुगृहिणीच म्हणावयाची शंकररावजी कौतुकाने म्हणत, माझी सून ध्वांक्ष आहे. म्हणजे कितीही कामाचा रगाडा पडला तरी उत्साहाने करणारी अशी आहे आणि हाच आमचा अनुभव आहे. जेवणाची टापटीप, व्यवस्था आणि रुची जे कांही ती काकूंच्यावेळी होत त्याचीच अनुकृती वाटते. भाऊसाहेबांच्या पत्नी मृत्यूच्या दाढेतून बाहेर पडलेल्या. पण संसारदक्ष आहेत. ती नानांची विद्यमान पीढी आपल्या मुलाबाळासह एवंगुण विशेषांनी संपन्न आहे.

---



# अन् आता हे शेवटचे मनोगत



विस्मृतीच्या गर्तेत लपलेल्या आणि लोपलेल्या स्मृती शोधून घरंगळलेल्या मौक्तिक मालेतील मण्याप्रमाणे, एकेक मणी मिळवावा आणि तो इतस्ततः कुठे तरी टाकावा किंवा ठेवावा असा या स्मृति-सौरभाचा आमचा प्रयत्न दौर्बल्याचा आणि दारिद्र्याचाच द्योतक आहे.

पण चिमणीने आपल्या लहानशा चोंचीत एखादी काडी आणावी आणि तेवढ्याच प्रयत्नाचे तिला आत्मसमाधान वाटावे तसे आमचे आहे म्हटले तरी चालेल. क्षणमात्रात जमविलेल्या या कणमात्रांनी दिवंगतांच्या पुण्यस्मरणाचे आणि या उदबत्तीनें आपणासारख्या वाचकांची धूपार्ती केल्याचेंही समाधान !

तुका म्हणे किती वानूं उपकार । मज निरंतर जागविती ।।"

---

## स्व. शंकररावजी सरनाईक

जन्म तिथी २-१०-१८८४ मृत्यू तिथी ३०-८-१९६६